ऑगस्ट क्रांतीचा नेता

# जयप्रकाश नारायण

: लेखक :

बा. न. राजहंस

# आनंदाची सुरुवात

सदरहू पुस्तक छापलें जात असताना श्री. जयप्रकाश नारायण आग्राजेलमध्यें तुरुंगवास भोगत होते. त्यांच्या सुटकेबाबद अनिश्चितता होती.

परंतु याच सुमारास इंग्लंडहून तीन ब्रिटिश प्रधानांचे एक मिशन हिंदुस्थानांत आले व त्यांनी हिंदुस्थानच्या भावी राज्यघटनेबाबत काँग्रेस व इतर पक्षांबरोबर बोलणी सुरू केली. अशावेळीं सर्व राजबंद्यांच्या मुक्ततेचा आग्रह काँग्रेसनें धरला.

श्री. जयप्रकाश यांच्या सुटकेबाबद बरीच भवति न भवति झाली व अखेर ता. ११-४-४६ रोजीं सायंकाळीं त्यांची मुक्तता करण्यात आली.

त्यांच्या मुक्ततेची माहिती देऊन हें पुस्तक वाचकाचे हातीं देताना आम्हास खूप आनंद होत आहे.

मुंबई
ता. २०-४-४६

—प्रकाशक

# १. बालपण

बिहार प्रांताचें नांव सर्वांनी ऐकलेंच असेल. १९४२ च्या प्रचंड आंदोलनांत बिहारचें नांव वर्तमानपत्रांमधें दररोज चमकत असे. अशा या महाराष्ट्रभूमी बिहार प्रांतामधील सारण नांवाच्या जिल्ह्यातील एका खेड्यांत इ. स. १९०२ सालीं जयप्रकाशजींचा जन्म झाला. जयप्रकाशजींचे वडील सरकारी नोकर असून वृत्तीनें धर्मनिष्ठ सनातनी होते. जयप्रकाशजींना दोन बहिणी व एक भाऊ अशी तीन भावंडें आहेत.

जयप्रकाशजींच्या बालपणांत सांगण्यासारखें असें कांहींच विशेष घडलें नाहीं. शाळेमध्यें असतांना त्यांचें अभ्यासाव्यतिरिक्त इतर कशाकडे लक्ष नसे. ते स्वतः अगदीं साधेपणानें रहात आणि 'आपण बरें की आपला अभ्यास बरा' अशा वृत्तीनें वागत असत. अगदीं अक्षरशः घरीं असतांना किंवा शाळेंतहि अभ्यासापलिकडे दुसरें कांहींच त्यांना सुचत नसे. त्यांच्या या अभ्यास-वृत्तीची एक फार मजेदार गोष्ट आहे. जयप्रकाशजी इंग्रजी शाळेंत असतानाच त्यांचे धाकटे बंधु राजेश्वरप्रसाद पाटण्यास त्यांचेबरोबर शिकण्यासाठीं राहिले होते. त्यावेळीं पाटण्याला फुटबॉलचा एक फार प्रेक्षणीय सामना चालू होता. राजेश्वरप्रसाद यांच्या मनांत तो सामना पहावयास जाण्याचें फार होतें. म्हणून त्यांनीं वडील भावाजवळ परवानगी मागितली. पण जयप्रकाशांना ही कल्पना बिलकूल पसंत पडली नाहीं. ते स्वतः तर सामना

पहाण्यास गेलेच नाहींत, पण भावानें मुद्दा सामने वगैरे न पहातां आपला अभ्यास करावा असें स्पष्टपणें बजावलें. मोठेपणीं सर्व तरुणांच्या गळयातला ताईत होणारा, व हिंदी राजकारणांत क्रांतिकारकांच्या आघाडीवर असणारा हा वीर लहानपणीं 'पुस्तकांतला किडा' होता असें सांगितलें तर कोणाला खरें देखील वाटणार नाहीं. पण तशी वस्तुस्थिति होती.

अर्थात् शाळेमध्यें असतांना जयप्रकाश एक हुशार विद्यार्थी म्हणून नांवाजले होते, हें सांगण्याची कांहीं जरुरी नाहीं. त्यांनीं आपला पहिला नंबर कधींच सोडला नाहीं. आणि १९१९ सालीं वयाच्या अवघ्या सतराव्या वर्षी ते पाटणा विश्वविद्यालयाची मॅट्रिकची परीक्षा पहिल्या वर्गांत पहिले येऊन उत्तीर्ण झाले.

मॅट्रिकची परीक्षा झाल्यानंतर जयप्रकाशजींचें लग्न झालें. बिहारचे सुप्रसिद्ध कॉंग्रेस पुढारी राजेंद्रबाबू यांच्या स्नुषेची बहीण प्रभावतीदेवी ही जयप्रकाशजींची पत्नी होय. लग्नाचे वेळीं प्रभावती देवींचें वय अवघें सोळा वर्षांचें होतें.

मॅट्रिक पास झाल्यानंतर जयप्रकाशजींनीं गणित व विज्ञान-शास्त्र हे विषय घेऊन पाटणा येथील सायन्स कॉलेजमध्यें पहिल्या वर्षांत नांव घातलें. त्यांच्या हुशारीमुळें-व अभ्यासू-वृत्तीमुळें त्यांना विश्वविद्यालयाकडून शिष्यवृत्ति मिळत होती, आणि ते स्वतः आपला अभ्यास उत्कृष्टपणें करून अध्यापक वर्गाचे मर्जी संभाळून होते.

गांधीजींनीं विद्यार्थ्यांना दिला. गांधीजींच्या या हाकेस 'ओ' देऊन किती तरी विद्यार्थ्यांनीं आपआपल्या शाळा सोडून दिल्या होत्या. पण वयाचीं वीस वर्षें होईपर्यंत स्वतःच्या अभ्यासाव्यतिरिक्त इतर कोणत्याहि गोष्टीमध्यें लक्ष न घालणारा हा हुषार विद्यार्थीपण आपली शिष्यवृत्ति आणि पहिला नंबर सोडून असहकाराच्या चळवळीमध्यें सामील होईल अशी कल्पना जर त्यावेळीं कोणी केली असती, तर लोकांनीं त्याला वेड्यातच काढलें असतें. पण विलक्षण घटनांनीं जयप्रकाशजींचें सारें आयुष्य भरलें आहे. तेव्हा त्यांच्या राजकीय जीवनाला सुरवात ही अशाच प्रकारें व्हावी यात आश्चर्य नाहीं.

गांधीजींची असहकाराची चळवळ सुरूं झाल्यानंतर आपणहि आता कॉलेज सोडून या चळवळीमध्यें सामील व्हावें असें जयप्रकाशजींना पण वाटू लागलें, आणि ही आपची कल्पना त्यांनीं आपल्या पिताजींजवळ बोलून दाखविली. सरकारी नोकरींत काम करणाऱ्या सनातनी वृत्तीच्या वडिलांना ही कल्पना पसंत पडणें शक्यच नव्हतें. शिवाय, इतक्या उत्तम तऱ्हेनें ज्यानें आपला अभ्यासक्रम चालविला आहे, आणि विश्वविद्यालयाची शिष्यवृत्ति मिळवली आहे, तो आपला मुलगा पुढेंमागें कोणीतरी मोठा सरकारी अधिकारी होऊन आपलें पांग फेडील अशी एक सुप्त आशा पण त्यांच्या मनात वावरत होती. तेव्हा अशा मुलानें आपलें शिक्षण मध्येंच सोडून देणें म्हणजे शुद्ध वेडेपणाचें आहे, असें त्यांचें सरळ मत होतें. व त्याप्रमाणें त्यांनीं आपलें मत मुलाजवळ बोलून पण दाखवलें. पण जयप्रकाशजींचे वडील जितके सनातनी होते, तितकेच ते सहिष्णु वृत्तीचे पण होते. त्यामुळें प्रथम त्यांनीं मुलाचें मन

वळविण्याचा प्रयत्न केला; पण एकदां मुलानें पक्कें मत बनविल्यानंतर त्यांनीं त्याला फारसा विरोध पण केला नाहीं. असहकाराची चळवळ संपल्यानंतरहि जयप्रकाशजींनीं अमेरिकेला जावयाचें ठरविलें. ही गोष्टहि त्याच्या पिताजींना तितकीशी पसंत पडली नाहीं. पण, तरीसुद्धां जावयाचें असें जयप्रकाशजींनीं एकदां ठरविल्यानंतर त्याच्या प्रवासखर्चाची सर्व तरतूद वडिलानींच करून दिली. जयप्रकाशजी एकदां अमेरिकेंत असतांना वडिलांनीं त्यांना कांहीं पैसे परत पाठविले होते. पण जयप्रकाशजींनीं ते पैसे परत पाठविले; कारण स्वत मिळवून शिकावयाचें असें त्यांनीं ठरविलें होतें. सहिष्णु-वृत्तीमुळें, जयप्रकाशजींच्या वडिलांनीं मुलाला जरी नापसंती दर्शविली, तरी विरोध किंवा अडथळा पण केला नाहीं.

शेवटी, वडिलांचा सल्ला, कॉलेजात मिळणारी शिष्य-वृत्ति किंवा भावी नोकरीचा मोह यापेक्षां कर्तव्यबुद्धीनें जयप्रकाशजींच्या मनावर विजय मिळविला. आणि कॉलेजातल्या पहिल्या नंबरची शिष्यवृत्ति सोडून ते असहकाराच्या चळवळींत सामील झाले. त्यावेळी ते पाटणा कॉलेजमध्यें इंटर सायन्सच्या वर्गामध्यें शिकत होते.

असहकाराची चळवळ १९२२ सालीं संपली. गांधीजींनीं ही चळवळ अर्धवट थांबविल्यामुळे देशांतले बरेच तरुण-कार्यकर्ते नाराज झाले. गांधीजींच्या हांकेला 'ओ' देऊन त्यांनीं देशाकरितां घरेंदारें, शाळा, शिष्यवृत्त्या यांच्यावर पाणी सोडलें होतें. पण, चौरीचौरा येथें झालेल्या अत्याचारी प्रकार मुळें गांधीजींनी असहकाराची चळवळ स्थगित केली.

स्वतः जयप्रकाशजी हे चळवळींत सामील झाले ते केवळ त्याच्या राष्ट्रीय भावनाच्या आवाहनामुळेंच. त्यावेळीं कॉलेजात शिकणारा एक वीस वर्षांचा भावनाप्रधान युवक यापलिकडे त्याच्या मनाची विशेष घडण काहींच झालेली नव्हती. आपण ज्या मार्गानें जातो, तो मार्ग चूक कीं बरोबर याचा पण त्यांनीं फारसा विचार केलेला नव्हता. ते स्वतःला त्यावेळीं गांधीवादी किंवा कोणत्याहि विशिष्ट् विचारसरणीचे अनुयायी समजत नव्हते. पण त्यावेळींसुद्धा देशात आणि एकंदर जगात जी विषमता दिसत होती त्या विषमतेमुळें त्याचें चित्त अगदीं विपण्ण झालें होतें. राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यात यश संपादन करून कदाचित् जनतेचीं हीं दुःखें दूर होतील, अशा एका अस्पष्ट भावनेनें ते असहकाराच्या या चळवळींत सामील झाले होते. पण जनतेचीं दुःखें नाहींशीं करावयाचीं असतील, तर कोणत्या शास्त्रीय संघटनातंत्राचा व विचारसरणीचा अनुनय केला पाहिजे, याची काहींच जाणीव त्याना नव्हती.

असहकाराची चळवळ फसल्यानंतर तर त्याच्या मनातला हा गोंधळ अधिकच वाढू लागला. चळवळीनंतर देशात दास–नेहरूंनीं सुरू केलेलें राजकारण त्याना आकर्षक वाटेना. मनाच्या अशा विपण्ण स्थितींत त्यांनीं पुढील शिक्षणासाठीं अमेरिकेंत जाण्याचें ठरविलें.

# २. अमेरिकेंत

असहकाराची चळवळ संपली, त्यात म्हणण्यासारखें यश आलें नाहीं. जयप्रकाशजींची वृत्ति फारच चलबिचल झाली. मनाच्या तशा अवस्थेंत ते अमेरिकेला गेले. पण इंग्लंड व अमेरिकेला जाऊन वडिलांनी पाठविलेल्या पैशावर चैन व अभ्यास करण्याइतके जयप्रकाशजी घरचे श्रीमंत नव्हते. त्या वेळेस ते अमेरिकेला पोंचले, तेव्हा एका सहामाहीची फी भरण्याइतकेसुद्धा पैसे त्यांच्याजवळ नव्हते.

१९२२ च्या ऑक्टोबरमध्यें ते कॅलिफोर्निया येथें येऊन पोंचले. युनिव्हर्सिटीची टर्म सुरू होण्यास अजून तीन महिने अवकाश होता. हे तीन महिने नुसतेच माशा मारीत बसणें त्यांना शक्य नव्हतें. त्यांना पैसे मिळवावयाचे होते आणि शिक्षण पण घ्यावयाचें होतें. अर्थात् कांहीतरी काम मिळवून पैसे जमविण्याकरिताच या तीन महिन्यांचा उपयोग करणें त्यांना अपरिहार्य होतें.

कॅलिफोर्नियामधील शीख व पठाणाना गांधीजीबद्दल आदर व चळवळीबद्दल उत्सुकता निर्माण झाली होती, व म्हणून हिंदुस्थानातून कोणी नवीन व्यक्ति आली तर चळवळीबद्दल आपणास बरीच माहिती मिळेल या कल्पनेनें हे लोक तिच्याशीं दोस्ती करीत असत. अर्थात् जयप्रकाशजींचें आगमन पण या लोकाना मोठा कुतूहलाचा विषय होऊन बसला. आणि जेव्हा या हिंदी लोकाना कळलें कीं, जयप्रकाशनीं आपलें कॉलेज व युनिव्हर्सिटी शिष्यवृत्ति सोडून असहकाराच्या चळवळींत भाग घेतला होता, तेव्हा तर जयप्रकाश त्या लोकात फारच प्रिय झाले आणि शेरखान नावाच्या एका भल्या मोठ्या पठाणानें त्याना आपल्या तुकडींत सामील करून घेतलें व एका फळाच्या बागेंत कामहि लावून दिलें.

फळाचा मोसम त्यावेळीं संपत आला होता व फळें तोडण्याचें काम चालू होतें. जयप्रकाश दिवसभर फळाच्या बागेंत काम करीत, फळें तोडून निरनिराळ्या प्रकारचीं फळें निरनिराळ्या ठिकाणीं टाकीत. या निरनिराळ्या ढिगातील वाईट फळें शोधून बाहेर काढण्याचें काम जयप्रकाशजींकडे होतें. पुढें राजकारणात पण हेंच काम त्याच्याकडे यावयाचें होतें. कॉंग्रेसमधील प्रतिगामी फळें उचलून बाहेर फेंकण्यासाठीं हिंदुस्थानात आल्यावर १२ वर्षे त्यानीं अविश्रात खटपट केली.

जयप्रकाशजींची काम करण्याची तडफ व शक्ति फार मोठी होती. ते दररोज दहा तास काम करीत व आठवड्याचे सातीहि दिवस ते कामात मग्न असत. त्यानीं सुट्टी कधीं घेतलीच नाहीं. तेथें मिळणारी मजुरी पण मोठी आकर्षक होती. दहा तास काम करून ते दररोज ४॥ डॉलर्स (१४ रु.) मिळवीत. अशा तऱ्हेनें

काम करून त्यांनी एका महिन्यात ८० डॉलर्स शिल्लक टाकले व मग युनिव्हर्सिटीत नाव घालण्यासाठी ते बर्कले येथे येऊन दाखल झाले. त्यांनी तेथे एक खोली घेतली व हातानें स्वयंपाक करून ते राहूं लागले.

कॅलिफोर्निया युनिव्हर्सिटीत एक टर्मभर शिक्षण घेतल्यानंतर जयप्रकाश पुन्हा बेकार झाले. मग त्यांनी एका पीचच्या बागेंत काहीं दिवस काम करून थोडे पैसे मिळविले—शिल्लक टाकले व आयोव्हा युनिव्हर्सिटींत ते दाखल झाले. या ठिकाणी कॅलिफोर्नियापेक्षा एक चतुर्थांश फी होती. म्हणून जयप्रकाशनी ही युनिव्हर्सिटी पसंत केली.

दुसऱ्या वर्षी जयप्रकाशनी विस्कॉन्सीन विश्वविद्यालयात प्रवेश केला. येथे असतांना त्यांच्या जीवनात एक अतिशय महत्त्वाची घटना घडून आली. जगात इतकी विषमता कां, याबद्दल जयप्रकाशजींचें मन नेहमी अस्वस्थ असे. एका मानव संस्थेचे

अर्थपद्धति कायम आहे, तोपर्यंत ही विषमता व हें दारिद्य नष्ट होणार नाहीं. हीं दुःखें जर नाहींशीं करावयाचीं असतील, तर भांडवलशाहीचा नाश करून समाजवादाचा स्वीकार केला पाहिजे. मग त्यांनीं समाजवाद म्हणजे काय हें सांगून त्यामुळें हीं दुःखें कशीं नाहींशीं होतील याचें पण विशदीकरण केलें. आपल्याला पाहिजे ती गोष्ट मिळाली या आनंदानें जयप्रकाशांनीं त्या प्राध्यापकाशीं खूपच दोस्ती केली. त्यांच्या मदतीनें मार्क्सवादावरचीं पुस्तकें अभ्यासण्यास त्यांनीं आरंभ केला.' व लवकरच ते पक्के समाजवादी बनले. त्यांच्या जीवनात एक क्रांति झाली. त्यांच्या जीवनानें एक नवीनच दिशा धारण केली. इतके दिवस ते शास्त्राचा अभ्यास करीत होते. पण तो सोडून देऊन त्यांनीं अर्थकारणाचा अभ्यास सुरू केला. हा अभ्यास चालू असताना ते एक अतिशय हुशार विद्यार्थी म्हणून गणले गले.

अमेरिकेंत जयप्रकाशांनीं जवळजवळ आठ वर्षें वास्तव्य केलें, आणि या ८ वर्षांच्या कालात निरनिराळ्या ५ विश्वविद्यालयात अनेक शास्त्राचा व विषयाचा अभ्यास केला. प्रथम त्यांनीं गणित, रसायन-शास्त्र व पदार्थ-विज्ञान-शास्त्र या शास्त्राचा अभ्यास केला. पण एकदा समाजवादाकडे आकृष्ट झाल्यानंतर व त्या विषयाचें महत्व पटल्यानंतर त्याना सामाजिक विषयांसंबंधीं गोडी निर्माण झाली. मग त्यांनीं प्राणी-शास्त्र, अर्थशास्त्र या विषयाचा अगदीं कसून अभ्यास केला. पण पैशाच्या अभावीं या त्यांच्या अभ्यासात अनेक वेळा खंड पडला. विश्वविद्यालयाची फी भरण्याकरिता व स्वतःचा चरितार्थ चालविण्याकरिता आपल्या आवडत्या अभ्यासातें खंड पाडून त्याना अनेक वेळेला रोजगार करावा लागला. 'पैसे मिळविण्यासाठीं त्यांनीं अनेक प्रकारचीं कामें केलीं. शेतावर मजूर म्हणून तर त्यांनीं काम केलेंच होतें,

एका लोखंडाच्या कारखान्यात त्यांनी एकदा मिस्त्रीचें काम केलें. एका कापडाच्या दुकानात विक्रेत्याचे काम त्यांनी केलें. इतकेंच काय पण एका हॉटेलांत त्यांनी वेटरचीसुद्धा नोकरी केली. पैसे मिळवून शिक्षण पुरें करणें हा त्यांच्या डोळ्यांसमोर मुख्य उद्देश होता. त्याकरिता पडेल किंवा मिळेल तें काम करण्यांत त्यांनीं बिल्कूल कमीपणा मानला नाहीं.

जयप्रकाशजींचें अमेरिकेंतील वास्तव्यात त्यांना फार बहुमोल अनुभव मिळाले. जीवनात ज्या एका प्रश्नानें ते अतिशय अस्वस्थ झाले होते, त्याचें उत्तर त्यांना सापडत नव्हतें, तें उत्तर त्यांना अमेरिकेंतच मिळालें. अमेरिकेंत असताना अमेरिकन कम्युनिस्ट पक्षाशीं त्यांचा निकट संबंध आला होता व दलित जनतेची संघटना करणें आवश्यक आहे हें सत्य त्यांना पटलें होतें. याच अमेरिकेंत प्रत्यक्ष दलितांशीं समरस होण्याची संधि त्यांना लाभली. त्यांनी मजुराचें जीवन, हॉटेलमधील पोऱ्याचें जीवन अनुभविलें होतें. अर्थात् त्यांचीं दुःखें कोणतीं, त्यांचे प्रश्न कोणतें याची स्पष्ट कल्पना त्यांना आली होती.

८ वर्षांपूर्वी एक अननुभवी, तरुण, भावनाप्रधान विद्यार्थी म्हणून ते अमेरिकेस गेले. पण परत येतांना त्यांच्यामध्ये अन्तर्बाह्य फरक झाला होता. १९२९ सालीं जेव्हा ते हिंदुस्थानात परत आले, तेव्हा त्यांनी मार्क्सवादाबरोबर समाजवादी जीवनातील विदेशी आवडी होती. राजकीय क्षेत्रात काम करण्याचा त्यांनी निश्चय केला होता आणि कष्टमय जीवन व्यतीत करण्याची त्यांची तयारी झाली होती. पुढें हिंदी राजकारणाला एक विशिष्ट पुरोगामी कलाटणी देण्यासाठीं त्यांनी जे प्रयत्न केले, त्याची सर्व पूर्व तयारी करूनच जणू ते अमेरिकेंतून परत आले.

## ३. इ. स. १९३०–१९३४

अमेरिकेंत सात वर्षे वास्तव्य केल्यानंतर जयप्रकाशजी परत आले. ते परत आले त्यावेळेस त्यांचे पिताजी अगदीं खंगून गेले होते. जयप्रकाशजींनीं कोठें तरी मोठी नौकरी करावी व खूप पैसा मिळवावा आणि म्हातारपणीं आपणाला सुख द्यावे अशी त्याच्या पिताजींची इच्छा होती. पण सुरवातीपासूनच जयप्रकाशजी वडिलाना सुख देऊ शकले नाहींत. वीस साली वडिलाच्या इच्छेविरुद्ध ते असहकाराच्या चळवळींत पडले. नंतर वडील नको नको म्हणत असतानाच ते अमेरिकेंत गेले. अमेरिकेंतून परत आले तेव्हा तर वडिलांची प्रकृति फारच खालावली होती. तेव्हा आतां आपण वडिलाच्या इच्छेप्रमाणें काहीतरी नौकरी करून त्याना थोडेंतरी सुख द्यावें असें जयप्रकाशना वाटू लागलें. त्याचवेळेस पंडित मदनमोहन मालवीयजींना ते भेटले. बनारस विश्वविद्यालयात "समाजशास्त्र" या विषयाचा अभ्यास सुरू करावा असे मालवीयजींच्या मनात घाटत होतें. स्वतः जयप्रकाशजी सात वर्षे अमेरिकेंत राहून त्या विषयाचा अभ्यास करून आले होते. तेव्हा त्यानाच विश्वविद्यालयात "समाजशास्त्र" या विषयाचे अध्यापक नेमण्याचें ठरलें. जयप्रकाशजींची नेमणूकही झाली, पण इतर काहीं तयारी व्हावयाची असल्यामुळें काम सुरू होण्यास अजून थोडा अवकाश होता. तेवढ्या अवधींत त्याचा व जवाहरलालजींचा संबंध आला. आणि जवाहरलालजींनीं त्याची अ. भा. कॉंग्रेस कमिटीच्या मजूर खात्यात नेमणूक केली. नेमणूक

झाली तेव्हां स्वतः जयप्रकाशांना तर बिलकूल कल्पना नव्हती कीं, आपण पुढें कायमचे कॉंग्रेसच्या कामात गुंतणार! उलट बनारस विश्वविद्यालयातील आपलें काम सुरू होईपर्यंतच हें काम करावयाचें असें त्यांनीं मनाशी ठरविलें होतें, पण आपल्या सर्वांच्या सुदैवानें त्याच सुमाराला कॉंग्रेसनें १९२९ चा संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव पास केला व सत्याग्रहाची प्रचंड मोहीम सुरू केली. अर्थात् जयप्रकाशजींनीं पितृप्रेमाखातर स्वतःच्या देशभक्तीच्या ज्या ज्या भावना दाबून टेवल्या होत्या, त्या उफाळून वर आल्या. आणि वडिलांस सुख देण्याकरता नोकरी करण्याची वगैरे मनाशीं ठरवलेले त्यांचे सर्व विचार विरून गेले, आणि त्यांनीं सत्याग्रह संग्रामात उडी घेतली. तीस साली प्रथम त्यांना सहा महिन्यांची शिक्षा झाली.

जयप्रकाशजींना शिक्षा झाली तेव्हां त्यांची मातोश्री फारच आजारी होती आणि मुलाच्या शिक्षेची वार्ता ऐकून त्यांना जो धक्का बसला त्यातच त्यांचा अंत झाला. याच चळवळींत जयप्रकाशजींची पत्नि प्रभावतीदेवी व त्यांचे धाकटे बंधू राजेश्वरप्रकाश यांना पण शिक्षा झाल्या. जयप्रकाशजींचे वडील प्रथमपासूनच आजारी होते. त्यातच त्यांची आई वारली. दोन्ही मुलें व सून कायदेभंग करून तुरुंगात गेली. या सर्व गोष्टींमुळें धक्का बसून वडिलांना अर्धांगवायूचा झटका आला व ते कायमचे अंथरुणाला खिळून बसले. सहा महिन्यानी जयप्रकाशजी सुटून आले. ते सुटून आले तेव्हां देशभर मोठी चळवळ पसरलेली होती. हजारों तरुण तुरुंगांत गेले होते. कितीतरी ठिकाणीं सत्याग्रह व कायदेभंग चाऊं होता. गांधीजींची शिष्टाई फुकट गेली होती, व सर्वत्र

गंभीर वातावरण होतें. घरीं आई वारलेली होती. वडील अंथरुणाला खिळून बसले होते. पण देशातील परिस्थितीमुळें त्याना घरच्या अडचणींचा विचार करणें शक्यच नव्हते. त्यावेळीं कॉंग्रेसचे सर्व नामवंत पुढारी तुरुंगात होते. अशा वेळीं अ. भा. कॉंग्रेस कमिटीच्या चिटणीसाची जबाबदारी त्यानीं पत्करली. त्यावेळीं त्याच्यावर सरकारचे पकडवॉरंट सुटलें. तेव्हा त्यानीं अ. भा. कॉंग्रेस कमिटीची कचेरी अलाहाबाद येथून हालवून मुंबईस नेली व ते स्वतः एक वर्षभरपर्यंत फरारी होते. त्यानीं सर्व हिंदुस्थानभर अज्ञातावस्थेंत दौरा काढला व चळवळीला जोर आणण्याचा प्रयत्न् केला. ते देशभर फिरले. व कॉंग्रेसचे अध्यक्षपद स्वीकारण्याची अनेक लोकाना विनंती केली. अज्ञातावस्थेंत असतानाच जयप्रकाशजी मद्रास येथें पकडले गेले. व पकडून त्याना मुंबई येथें आणण्यात आलें. त्या ठिकाणीं त्याच्यावर खटला होऊन त्याना दोन वर्षांची सजा देऊन नाशिकच्या तुरुंगात पाठविण्यात आले.

नाशिकच्या तुरुंगात जयप्रकाशजींची अनेक तरुण कार्यकर्त्यांबरोबर ओळख झाली. त्या ठिकाणीं जयप्रकाशजीबरोबर मेहरअली, अशोक मेहता, एन् जी. गोरे, अच्युतराव पटवर्धन वगैरे घडाडीचे कार्यकर्ते होते. या सर्वांनी १०।३२ च्या सत्याग्रहाच्या मोहिमेंत अहमहमिकेनें भाग घेतला होता. पण इतके असूनही सत्याग्रहाची चळवळ यशस्वी होऊं शकली नाहीं. याची जाणीव या सर्व कार्यकर्त्यांना अतिशय तीव्रतेनें होऊं लागली होती.

स्वातंत्र्यलढा यशस्वी करावयाचा असेल, तर कॉंग्रेसची त्यावेळची संघटना आणि सत्याग्रहाचें तंत्र एवढ्याच गोष्टी पुन्हा

पडणार नाहींत, ही जाणीव पण या सर्व कार्यकर्त्यांना झाली होती. संघटनेस काहींतरी करून क्रांतिकारक वळण लावलें पाहिजे असें त्याना वाटूं लागलें होतें व त्या दृष्टीनें त्यानीं विचार चालवला होता. स्वतः जयप्रकाशजीनीं अमेरिकेंत असतांना समाजवादाचा अभ्यास केला होताच. तसेंच कॉंग्रेसच्या ३०–३२ च्या सत्याग्रहाच्या चळवळींत पडलेल्या बऱ्याच तरुणाचा कल समाजवादी विचारसरणीकडे झुकूं लागला होता. आणि गांधीजींच्या सत्याग्रहतंत्रामुळें पदरीं पडलेलें अपयश पाहून तर त्यांची समाजवादी विचारसरणीवरील निष्ठा अधिकच दृढ झाली होती. म्हणून हे सर्व तरुण कार्यकर्ते नाशिकच्या तुरुंगामध्यें एकत्र जमले असताना हिंदी राष्ट्रीय चळवळीकडे समाजवादी दृष्टीकोनातून पाहूं लागले. असा विचार करताना त्याना दोनतीन गोष्टी प्रामुख्यानें दिसून आल्या. एक म्हणजे कॉंग्रेसची चळवळ अजून किसान–कामगारापर्यंत गेलीं नाहीं, दुसरी गोष्ट म्हणजे सत्याग्रहाचे तंत्र साम्राज्यशाहीचा नाश करण्यास अपुरें आहे; व तिसरी गोष्ट कॉंग्रेसचे कार्यकर्ते जनतेची संघटना त्यांच्या दैनंदिन–गाऱ्हाण्यावर करीत नाहींत.

कॉंग्रेसची संघटनेची दिशा व स्वीकारलेलें स्वरूप बदललें पाहिजे. आणि तें बदलावयाचें असेल, तर कॉंग्रेस कार्यकर्त्यांनी समाजवादी दृष्टीकोनाचा अंगीकार केला पाहिजे, ही गोष्ट जयप्रकाशप्रभृति तरुण कॉंग्रेसकार्यकर्त्यांना पूर्णपणें पटली. तसेंच देशामध्यें समाजवादी दृष्टिकोनामधून काम करणारा जो हिंदी कम्युनिस्ट पक्ष तो तर कॉंग्रेसविरोधी होता. त्यामुळें ह्या पक्षाचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं ही गोष्ट पण त्याना समजून चुकली. तेव्हां कॉंग्रेस–कार्यकर्त्यांमध्यें एक शास्त्रशुद्ध दृष्टिकोन

आणणें, व त्याच्यातर्फे किसान कामगाराची क्रांतीकारक वर्गसंघटना करणें हें महत्त्वाचें काम आपणच पत्करले पाहिजे ही गोष्ट पण त्यानीं ओळखली व त्या दृष्टीनें कॉंग्रेसला पूरक असें काम करणाऱ्या समाजवादी तरुण कार्यकर्त्यांचा एक पक्ष संघटित करण्याचें जयप्रकाशप्रभृति लोकानी नाशिकच्या तुरुंगातच ठरवून टाकलें. जयप्रकाश जवळ जवळ दोन वर्षे नाशिकच्या तुरुंगात होते. एवढ्या अवधींत त्यानीं अनेक मित्र व सहकारी जमा केले. सर्वांशीं मिळून मिसळून वागण्याची त्याची वृत्ति त्याना फारच उपयोगी पडली. तुरुंगामध्यें असताना ते सर्वांमध्यें फारच प्रिय झाले होते. या दोन वर्षांच्या वास्तव्यात भावी समाजवादी पक्षाची कच्ची योजना आखून व ती योजना पार पाडण्यासाठीं जिवाचे सहकारी मिळवून ते नाशिकच्या तुरुंगातून बाहेर पडले.

# ४. समाजवादी पक्षाची स्थापना

जयप्रकाश नाशिकच्या तुरुंगातून सुटून आले, तेंव्हा समाजवादी पक्षाची स्थापना करण्याची कल्पना घेऊनच. स्वातंत्र्याचा लढा जर अधिक तीव्र व यशस्वी करावयाचा असेल तर कॉंग्रेसच्या धोरणात बदल घडवून आणला पाहिजे व तो आणावयाचा असेल, तर हा बदल घडवून आणूं इच्छिणारांनी संघटित प्रयत्न केला पाहिजे. या गोष्टी आपल्या सहकाऱ्यांच्या सल्ल्यानें त्यांनीं निश्चितपणें ठरविल्या होत्या व बाहेर आल्या-बरोबर त्यांनीं स्वत पुढाकार घेऊन हें काम आपल्या शिरावर घेतलें.

सुटकेबरोबर थोड्याच दिवसांत त्यांनीं पाटण्यास एक अखिल भारतीय कॉंग्रेस समाजवादी परिषद भेल वली. याचवेळीं पाटणा येथें ऑ. इं. कॉं. कमिटीची सभा पण बोलावली होती. व आता सत्याग्रह थांबवून कॉंग्रेसनें कायदेकौन्सिलांचा कार्यक्रम स्वीकारावा, असा प्रस्ताव त्या सभेपुढे होता कॉंग्रेसमधले उजवे व सुधारणावादी लोक कॉंग्रेसला सनदशीर मार्गाकडे नेण्याचा प्रयत्न करीत होते तेव्हा याचवेळीं कॉंग्रेसमधल्या जहाल व लढाऊ लोकांनीं प्रभावी संघटना करून कॉंग्रेसला लढाऊ मार्गावर ठेवण्याचा प्रयत्न करणें अवश्य होतें. त्या दृष्टीनें जयप्रकाशनी बोलावलेल्या परिषदेला फार महत्त्व होते.

कॉंग्रेस समाजवादी पक्षाची रीतसर स्थापना करण्यापूर्वी हिंदुस्थानभर पसरलेले समाजवादी गट संघटित करणें जरूर होतें.

व म्हणून या परिषदेंत एक तात्पुरती समिति नेमण्यात आली व जयप्रकाशना त्या समितीचे चिटणीस नेमण्यात आले. जयप्रकाशनीं सर्व हिंदुस्थानभर फिरून समाजवादी गटाची संघटना केली, आणि लवकरच मुंबई येथें कॉंग्रेस समाजवादी पक्षाचे पहिलें अधिवेशन भरलें व जयप्रकाश त्या पक्षाचे सरचिटणीस झाले.

हें काम अंगावर घेताना जयप्रकाशनी अतिशय अवघड व नाजूक जबाबदारी स्वीकारली. त्याना अनेक टीकाकाराना तोंड द्यावयाचें होतें. अनेक अडचणी त्याना सोसाव्या लागल्या. कॉंग्रेसमधील उजवे लोक तर त्याच्यावर टीका करीतच होते; पण कम्युनिस्टासारखे जहाल म्हणविणारे पण त्याच्यावर कुत्सित टीका करीत. या दोघानाही न डगमगता त्याना योग्य तें उत्तर देऊन, त्यानीं पसरवलेले गैरसमज दूर करून आपल्या अनेक अनुयायाना बरोबर घेऊन कॉंग्रेसला संपूर्णपणें साम्राज्यविरोधी करावयाचें व साम्राज्यविरोधी आघाडीला जनतेच्या संघटनेचा आधार देऊन तिला अधिक बळकट करावयाचें आणि हें करीत असताना कॉंग्रेसमध्यें व पर्यायानें राष्ट्रीय चळवळींत फूट पडूं द्यावयाची नाहीं, इतकें अवघड व नाजूक काम जयप्रकाशना पार पाडावयाचें होतें.

त्यानी हें काम कसें पार पाडलें हें पहावयाचें असेल तर गेल्या दहाबारा वर्षांतील समाजवादी पक्षाचा इतिहास स्थूल मानीन पाहिला पाहिजे. जयप्रकाश स्वतः तर पक्षाच्या कार्याशी पूर्णपणें समरस झाले होते, इतके कीं, १९३६ सालीं जवाहरलाल नेहरूंनीं त्याना वर्किंग कमिटींत घेतलें, (वर्किंग कमिटीचा सभासद म्हणजे केवढा मान!) पण वर्कींग कमिटींत राहून आपण आपलें उद्दिष्ट

साध्य करूं शकत नाहीं हें दिसताच त्यानीं त्या बहूमानाचा त्याग केला. व अंगिकारलेलें पक्षसंघटनेचें, कॉंग्रेसला अधिक पुरोगामी करण्याचें काम नेटानें हातीं घेतलें. येथून पुढें जयप्रकाशजींचे जीवनचरित्र समाजवादी पक्षाच्या विकासाशीं एकरूप झालें. *स्वतःच्या आवडीनिवडी व संसार सारे सोडून ते पक्षसंघटनेशीं* समरस झाले व येथून पुढें त्याचे जीवनचरित्र पहावयाचे असेल तर पक्षाच्या संघटनेसाठीं त्यानीं काय केलें, कॉंग्रेसला अधिक जहाल बनवण्यासाठीं त्यानीं कोणते धोरण आखलें व तें यशस्वी करण्यासाठीं त्यानीं कसे परिश्रम केले हेंच पाहिले पाहिजे.

कॉंग्रेस समाजवादी पक्षाची रीतसर स्थापना झाली. तेव्हां सर्व कार्यकर्ते अननुभवी होते; पण ते तरुण व उत्साही होते. राष्ट्रीय स्वातंत्र्याबद्दल त्याना तळमळ होती व कॉंग्रेसचे जुने पुढारीगण हें स्वातंत्र्य हाशील करण्यास असमर्थ आहे अशी पण त्याची खात्री होती. तेव्हा १९३४ सालीं भरलेल्या समाजवादी पक्षाच्या अधिवेशनात पक्षानें एक प्रबंध तयार केला. जुन्या पुढाऱ्याचे कॉंग्रेसमधून उच्चाटण करून, नवें पुरोगामी नेतृत्व निर्माण केलें पाहिजे, असे त्यानीं ठरविलें. पण वीस वर्षे ज्यानीं राष्ट्रीय चळवळ चालविली होती. व साम्राज्यशाहीशीं दोन वेळा देशव्यापी टक्कर दिली होती. अशा लोकाना केवळ हाकलले पाहिजे म्हणून ते हाकलले जाणार नाहीत, हें जयप्रकाशप्रभृति सर्वांना दोनच वर्षांत कळून चुकलें; आणि १९३६ सालीं पक्षाचें फैजपूर येथें जें अधिवेशन भरलें त्यांत त्याना आपला पवित्रा बदलावा लागला. कॉंग्रेसचे पुढारीपण बदलणें म्हणजे कांहीं जयप्रकाशना गांधीजींच्या जागीं बसणें नव्हे; तर ज्या कार्यक्रमाच्या योगें कॉंग्रेस अधिक बलवान होईल, अधिक साम्राज्यविरोधी

होईल, अधिक जनताभिमुख होईल, असा कार्यक्रम तिला मान्य करण्यास लावणें हें होय. ज्या कार्यक्रमाच्या योगानें जनतेच्या आर्थिक शृंखला नाहींशा करता येतील व पूर्ण राजकीय व आर्थिक सत्ता तिच्या पदरात पडेल, असा किमान कार्यक्रम काँग्रेसला मान्य करण्यास भाग पाडणें हेंच समाजवाद्यांचें कर्तव्य होतें. व काँग्रेस सनदशीरपणाच्या, सहकार्याच्या वळणावर चालली होती तेथून तिला ओढून काढून साम्राज्यविरोधी स्वातंत्र्ययुद्धाच्या मार्गावर तिला आणणें हेंच जयप्रकाश व त्याचे सहकारी यांचें आद्य कर्तव्य होतें. या देशात समाजवाद स्थापन झाल्याखेरीज जनतेच्या अंतिम मागण्या पुऱ्या होणें अशक्य आहे, या गोष्टीचा त्यानीं जरुर तो प्रचार केलाच. पण मुख्यतः राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा तीव्र करणें, स्वातंत्र्याचा लढा यशस्वी करण्यासाठीं नवीन तंत्र अवलंबिलें पाहिजे ही गोष्ट काँग्रेसला पटवून तिला क्रांतिकारक मार्गावर आणणें हेंच जयप्रकाश व त्यांचा समाजवादी पक्ष यांच्या पुढचें प्रमुख कार्य होतें.

## ५. जयप्रकाश व राष्ट्रीय एकजूट

आपलें हें कर्तव्य जयप्रकाशनी कसें पार पाडलें ? आणि कर्तव्य योग्य रीतीनें पार पाडता यावें म्हणून त्यानी कोणता कार्यक्रम आखला ? साम्राज्यविरोधी संयुक्त आघाडी बळकट करणें हें त्यांचें पहिलें कार्य होतें. किसान व मजूर हे जरी साम्राज्यविरोधी आघाडीचे वर्ग असले तरी हिंदुस्थानातील साम्राज्यविरोधी चळवळ प्रामुख्यानें राष्ट्रसभेमेंच चालविली होती, ही गोष्ट जयप्रकाशजी जाणून होते; पण काँग्रेस ही संपूर्णपणें साम्राज्यविरोधी बनली नव्हती, तेव्हा देशातील सर्व साम्राज्य-विरोधी शक्तींचा संयुक्त मोर्चा बांधणें, आणि या कामासाठीं काँग्रेसला अधिक बलवान, लढाऊ व जनताभिमुख करणें हाच मार्ग आपण चोखाळला पाहिजे ही गोष्ट जयप्रकाशजी जाणून होते.

आणि हा मार्ग आक्रमताना जयप्रकाशनी आपल्या डोळ्यां-समोर तिहेरी कार्यक्रम ठेवला होता. एक काँग्रेसमधले काम. दुसरा भाग म्हणजे काँग्रेसबाहेर किसान–मजूर संघटनेचें काम व ही दोन्ही कामें करीत असताना जहाल व समाजवादी एकजूट घडवून आणणें हा त्याच्या कार्यक्रमाचा तिसरा भाग होता. जयप्रकाशजींनी ज्यावेळी समाजवादी पक्ष स्थापन केला, तेव्हां काँग्रेस ही अधिकाधिक सनदशीर वळणावर चालली होती. तेव्हां काँग्रेसचा गाडा हा सनदशीर वळणावर जाऊं नये, साम्राज्यविरोधी लढा केल्यावांचून आपलें उद्दिष्ट साध्य होणार नाहीं, हा लढाऊ दृष्टी-

कोन जास्तींत जास्त काँग्रेसवाल्यांना पटवून देण्याचें काम त्यांनीं आपल्या पक्षामार्फत जोरदारपणें चालविलें होतें. फैजपूरपासून तें त्रिपुरीपर्यंत ज्या ज्या अ. भा. काँग्रेस कमिटीच्या सभा झाल्या, त्यामध्यें हा दृष्टीकोन प्रभावी करण्याचा प्रयत्न त्यांनीं अविरतपणें चालविला होता. तसेंच काँग्रेसचें काम खेडोंपाडीं व मजूर वर्गामध्यें पसरवून त्यांचे प्रतिनिधी निरनिराळ्या काँग्रेस कमिट्यांवर आणून काँग्रेसला अधिक लढाऊ व साम्राज्यविरोधी बनवण्याचें काम पण जोरदारपणें चालवलें होतें. याकरता जयप्रकाश व त्यांच्या सहकाऱ्यांनीं ठिकठिकाणीं राजकीय परिषदा, साम्राज्यविरोधी व फेडरेशन-विरोधी परिषदा घेऊन काँग्रेसची साम्राज्यविरोधी भूमिका अधिक प्रज्वलित केली.

पण जयप्रकाशजींचें यापेक्षां महत्त्वाचें काम काँग्रेसच्या बाहेर होतें. ज्या दलित जनतेच्या संघटित शक्तीच्या जोरावर हिंदी स्वातंत्र्याचा लढा यशस्वी होणार अशी जयप्रकाशजींची खात्री होती, त्या जनतेशी काँग्रेस अजून समरस झाली नव्हती; तेव्हां अशा जनतेची संघटना करून तिला राष्ट्रीय चळवळींत खेचणें हेंच फार महत्त्वाचें काम होतें. तसेंच या संघटित जनतेचें वजन काँग्रेस कार्यकर्त्यांवर आणून, त्यांना अधिक साम्राज्यविरोधी व प्रगतिकारक धोरण आंखण्यास सांगणें हें पण महत्त्वाचें काम होतें. या जनतेला स्वातंत्र्यलढ्यांतील तिचें स्थान व कर्तव्य समजावून देऊन स्वातंत्र्यालढा अधिक तीव्र करणें हेंच काम जयप्रकाश यांच्यापुढें अधिक महत्त्वाचें होतें. आणि हें काम समाजवादी पक्षातर्फे आपणास अधिक जोरदारपणें करतां यावें म्हणून त्यांनीं काँग्रेस वर्किंग कमिटीच्या सदस्यत्वाचा राजीनामा देऊन ती बहुमोल

मानाची जागा त्यांनी सोडली होती. इतका आपल्या विचारसरणीवर त्यांचा अढळ विश्वास होता.

आणि हें काम यशस्वी रीतीनें पार पाडण्यासाठीं जयप्रकाशनीं ठिकठिकाणच्या समाजवादी कार्यकर्त्यांना किसानांची व मजुरांची संघटणा करण्याचा आदेश दिला होता. त्यांच्या या आदेशाप्रमाणें त्यांच्या स्वत:च्या बिहारप्रांतांत प्रचंड प्रमाणांत किसानांची संघटना घडवून आणली होती आणि या संघटनेचें हृदय-स्वरूप म्हणजे ४२ च्या चळवळींत बिहारप्रांतांत झालेलें विराट आंदोलन. बिहारप्रमाणें संयुक्तप्रांत, बंगालमध्यें पण समाजवादी पक्षाच्या कार्यकर्त्यांनीं किसान-संघटना मोठ्या प्रमाणांत केली होती. त्याचप्रमाणें ठिकठिकाणीं मजूर संघटना करण्याचें काम पण त्यांनी हातीं घेतलें होतें. स्वत: जयप्रकाशनीं जमशेदपूर येथें कामगार वर्गांत राष्ट्रीय जागृति करण्याचें काम फार मोठ्या प्रमाणावर केलें होतें. हें सर्व काम यशस्वी रीतीनें पार पाडण्यासाठीं देशभर होतकरू कार्यकर्त्यांचें जाळें निर्माण करणें हें काम जयप्रकाश यांच्यापुढें होतें. या साठीं जीवापाड मेहनत करून त्यांनी सर्व देशभर समाजवादी पक्षाची संघटना उभी केली. पंजाब, बिहार, महाराष्ट्र, आंध्र, संयुक्तप्रांत वगैरे प्रांतांत दौरे काढून समाजवाद्यांना एकत्र आणून, कार्यक्रम करण्यासाठीं त्यांनीं पक्षाच्या सुरवातीपासून १९३९ पर्यंत पांच वर्षें जीवाचें रान केलें.

अशा तऱ्हेनें हिंदी साम्राज्यविरोधी आघाडी मजबूत व व्यापक करतांना जयप्रकाशनीं दोन पर्वें कसोशीनें पाळण्याचा फार प्रयत्न केला. एक म्हणजे काँग्रेसला अधिक साम्राज्यविरोधी करण्याच्या

भरांत काँग्रेसची किंवा हिंदी राष्ट्रीय चळवळीची एकजूट फोडावयाची नाहीं. आणि त्याचे दुसरें आवडतें स्वप्न म्हणजे स्वतःच्या पंथाची गटबाजी न करतां समाजवादी लोकांची एकजूट घडवून आणण्याची महान आकांक्षा जयप्रकाशनीं बाळगली होती.

यांपैकीं काँग्रेसची व पर्यायानें राष्ट्रीय फळीची एकजूट टिकविण्याचा त्यांचा प्रयत्न पूर्णपणें यशस्वी झाला. पक्षाच्या सुरवातीपासूनच काँग्रेसमधल्या उजव्या लोकानी पक्षावर टीका करण्याचा सपाटा चालविला होता. हे लोक काँग्रेसमध्यें सवतासुभा निर्माण करून काँग्रेसमध्यें फूट पाडण्याचा प्रयत्न करतात, असा प्रचार उजव्यांनीं सुरवातीपासूनच चालविला होता; पण आपणाला काँग्रेसमध्यें फूट पाडावयाची नसून राष्ट्रीय आघाडी अभंग ठेवावयीचा आहे व ही अभंग आघाडीच अधिक बळकट व साम्राज्यविरोधी करावयाची आहे हें जयप्रकाशनी स्वतःच्या कृतीनें दाखवून दिलें होतें.

समाजवादी पक्ष स्थापन झाला तेव्हां कम्युनिस्टांनीं 'भांडवलशाहीचे जहाल सोंग' अशी टीका त्याच्यावर सुरू केली. काँग्रेस ही भांडवलदाराची संस्था असून समाजवादी हे जहालपणाचा बुरखा घेतलेले त्याचे हस्तक आहेत, असा त्याच्या टीकेचा रोख होता. पण जयप्रकाश असल्या टीकेला जुमानणारे नव्हते. काँग्रेस ही हिंदुस्थानच्या स्वातंत्र्य-चळवळीची आघाडी होती. वीस वर्षेपर्यंत तिनें साम्राज्याविरुद्ध लढा चालविला होता. तो आपल्याला तीव्र करावयाचा असेल तर काँग्रेसमध्येंच राहिले पाहिजे, काँग्रेस सोडतां कामा नये; मग त्याकरतां कितीहि निष्ठुर टीका सहन करावी लागली तरी हरकत नाहीं, असें चोख उत्तर त्यांनीं कम्युनिस्टांना दिलें. काँग्रेसमध्यें फूट पाडणें म्हणजे राष्ट्रीय शक्ती खच्ची करणें होय.

हें जाणून प्रसंगीं पड खाऊनही त्यांनी काँग्रेसमध्यें दुफळी होऊं दिली नाहीं.

कम्युनिस्टांप्रमाणेंच सनदशीर काँग्रेसवाले समाजवाद्यांवर उलट टीका करीत, की हे सवता सुभा करतात. पण काँग्रेसच्या घटनेप्रमाणें राष्ट्रीय चळवळीस पोषक असा कोणताही प्रचार करण्यास मुभा होती व त्याप्रमाणें समाजवादी करीत होते. पण स्वतःच्या हट्टाखातर काँग्रेसच्या शिस्तीपलीकडे जाऊन काँग्रेस-मध्यें त्यांनी दुफळी कधींच माजविली नाहीं. १९३५ चा कायदा पास झाला, तेव्हा काँग्रेसनें मंत्रिमंडळें स्वीकारूं नयेत असेंच त्यांचें म्हणणें होतें व त्याप्रमाणें त्यांचा प्रचारही चालू होता; पण काँग्रेसनें बहुमतानें अधिकार-स्वीकाराचा ठराव संमत केल्या-नंतर तो निर्णय स्वतःच्या मताविरुद्ध असूनही समाजवाद्यांनी काँग्रेसची शिस्त म्हणून मान्य केला व मंत्रीपदें स्वीकारण्याविरुद्ध टीका करण्याचें सोडून आपल्या निवडणूक जाहिरनाम्यांत काँग्रे-सनें जी आश्वासनें दिली होतीं तीं मंत्रिमंडळांनी पार पाडावीत, म्हणून जयप्रकाशजींनी आपल्या पक्षातर्फे खटपट सुरू केली.

जयप्रकाश नारायण यांची काँग्रेस मंत्रिमंडळाकडे पहाण्याची दृष्टी संपूर्णपणें काँग्रेसला पोषक अशीच होती. काँग्रेस ही आपली, जनतेची आहे, व काँग्रेसचे मंत्री हे तिला जनताभिमुख करीत आहेत, तर स्पष्ट व सडेतोड टीका करण्यास किंवा प्रसंग पडला तर दडपण आणण्यासही त्यांनी मागेंपुढें पाहिलें नाहीं. पण या टीकेंत कम्युनिस्टांप्रमाणें प्रतिस्पर्धीपणाचा भाग नव्हता, तर मित्रत्वाचा व आपलेपणाचा जिव्हाळा होता. मंत्रिमंडळाबाबतची आपली भूमिका स्वतः जयप्रकाशनी एके ठिकाणी स्पष्ट केली आहे, ती अशी:—

"काँग्रेस मंत्रीमंडळें उलथून पाडणें किंवा त्याना त्रास देणें हें आमचे धोरण नाहीं. आणि जरी आम्ही मंत्रिपदस्वीकाराविरूद्ध होतो, तरी आमची टीका ही काहीं शत्रुत्वाच्या भावानें किंवा मंत्रिमंडळाचे नाव बद्द करण्याच्या दृष्टीनें केलेली नाहीं. काँग्रेसशी सहकार्य करून तिनें चालविलेला स्वातंत्र्याचा लढा आम्हाला अधिक तीव्र करावयाचा आहे. पण टीका करण्याचा आमचा हक्क आम्ही कधींच नाकबूल करणार नाहीं व काँग्रेसमधल्या सर्व सुधारणावादी गटानीं आमच्याबद्दल कितीही गैरसमज पसरविले,तरी तो हक्क बजावल्याशिवाय राहणार नाहीं...आमच्या पक्षानें ज्या तरुणाच्या, शेतकऱ्याच्या व कामकऱ्यांच्या संघटना बांधल्या आहेत, त्या काँग्रेसविरोधी नसून उलट काँग्रेसचे व मंत्रिमंडळाचे हात नोकरशाहीविरुद्ध बळकट करणें, हाच त्या संघटनाचा हेतू आहे. कारण, लवकरच आपणास फेडरेशनविरोधी एक तीव्र लढा करावयाचा आहे."

काँग्रेस-मंत्रिमंडळानीं जाहीरनाम्यांत दिलेली आपली आश्वासनें पार पाडावीत हाच जयप्रकाशप्रभृतींचा हेतु होता. सर्व राजबंद्यांची आम्ही सुटका करू असें आश्वासन[1] निवडणुकीच्या जाहीर नाम्यांत देण्यात आलेलें होतें. पण बिहार व संयुक्त प्रांताच्या गव्हर्नरांनीं सर्व राजबंदीमुक्ततेला विरोध केला, तेव्हा आपल्या तत्वासाठीं तेथील काँग्रेस मंत्रिमंडळांनीं राजीनामे द्यावेत व तेवढ्यानें जर त्या दोन प्रांताचे गव्हर्नर नमले नाहीत तर निषेधार्थ सर्वत्र काँग्रेस मंत्रिमंडळांनीं राजीनामे द्यावेत, अशी सूचना जयप्रकाशनीं मांडली. काँग्रेस मंत्री कांकूं करूं लागले, तेव्हां सेवाग्रामला जाऊन जयप्रकाशनी गांधीजींच्या जवळ धरणें धरून

नमले व अखेर तेथील मंत्रिमंडळांनी राजिनामे सादर केले. राजिनामे सादर करताच गव्हर्नर पण नमले व राजबंद्यांची सुटका झाली व काँग्रेस-मंत्रिमंडळाची प्रतिष्ठा वाढली.

काँग्रेस मंत्रिमंडळावर टीका या भूमिकेवरूनच होत होती. काँग्रेसनें मंत्रिमंडळाचा स्वीकार केल्यानंतर जयप्रकाशनीं आपल्या धोरणाचीं दोन अंगें ठेवलीं होतीं. एक काँग्रेसमधील सुधारणवादी लोक घटनेच्या आहारी जाऊन, काँग्रेसचें साम्राज्य-विरोधी स्वरूप विसरून–( अशी गोष्ट मद्रास प्रांतांत झाली होती. घटनाभंगासाठीं आपण अधिकार-स्वीकार केला आहे, ही गोष्ट विसरून ब्रिटिश सरकारनें स्वतःच्या सोईसाठीं केलेल्या १४४ कलमाचा उपयोग राजाजींच्या मंत्रिमंडळानें केला. बाटलीवाला यांची अटक किंवा मेहेरअली यांची हद्दपारी अशाच भूमिके-वरून झाली होती. बिहारच्या मंत्रिमंडळानें किसान कार्यकर्त्यांवर निर्बंध घातलेले होते.) काँग्रेसला आत्मघातकी स्वरूप येऊं लागलें, त्याविरुद्ध कडक आणि सडेतोड टीका समाजवादी पुढाऱ्यांनीं केलेली आहे. कलकत्ता येथें भरलेल्या अ. भा. काँग्रेस कमिटीच्या बैठकीत मंत्रिमंडळाचा प्रश्न चर्चेस निघाला असतांना जयप्रकाशप्रभृति समाजवाद्यांनीं हा प्रश्न धसास लावला होता, व त्यांत बरेचसें यशहि संपादन केलें. काँग्रेस-मंत्रिमंडळें ही सरळपणें अ. भा. काँग्रेस कमिटीला जबाबदार असलीं पाहिजेत व असेंब्लीमधल्या काँग्रेस पक्षांना जबाबदार नसावीत हें समाजवाद्यांचें म्हणणें काँग्रेसला मान्य करावें लागलें व घटनावादाकडे घसरत चाललेली काँग्रेसची गाडी थोडीतरी रुळावर आली.

जयप्रकाशजींच्या मंत्रिमंडळासंबंधींच्या धोरणाचें दुसरें अंग म्हणजे मंत्रिमंडळावर जनतेचें दडपण आणणें. पण तें शत्रुत्वाच्या भावनेनें नव्हे, तर आपुलकीच्या. ही मंत्रिमंडळें आपली आहेत, आपली गाऱ्हाणीं त्याच्यासमोर माडलीं पाहिजेत, या आपुलकीच्या भावनेनें बिहारमध्यें किसनाचे मोर्चे मंत्रिमंडळाकडे गेले. महाराष्ट्रात एस्. एम्. जोशी प्रभृति समाजवादी कार्यकर्त्यांनीं किसानाचा मोर्चा कौन्सिल हॉलवर आणला होता. तीच गोष्ट नागपूर, संयुक्तप्रात वगैरे ठिकाणीं पण घडून आली. या सर्व निदर्शनाच्या मागची भूमिका जनतेचें वजन आणून मंत्र्याचे हात बळकट करावेत हीच होती. काँग्रेसनें निवडणुकीच्या वेळीं जाहीरनामा काढून जनतेला जीं आश्वासनें दिलीं होतीं त्याचीं आठवण मंत्र्याना करून देण्यासाठीं हीं निदर्शनें करणें भाग होतें. एकंदरीत समाजवादी पक्षाची मंत्रिमंडळाकडे पहाण्याची भूमिका पूर्णपणें आपलेपणाची होती. मंत्रिमंडळानीं केलेल्या सत्कृत्याबद्दल त्याना दुवा द्यावयास जसे ते चुकले नाहींत, तसेंच त्यानीं केलेल्या चुकाबद्दल त्याच्यावर टीका करण्यास पण ते विसरले नाहींत. पण ही टीका करताना मंत्रिमंडळें बदनाम होणार नाहींत या गोष्टीची दखल घेण्यास ते कधींच विसरले नाहींत.

याचें सर्वांत उत्कृष्ट उदाहरण खुद्द जयप्रकाशजींच्याच बिहार प्रातात दिसून आलें. बिहार प्रातात किसानसभेची संघटना फार जोरांत फोफावली होती, व त्यानीं किसानांची मोठमोठीं निदर्शनें घडवून आणून आपल्या मागण्या काँग्रेसमंत्रिमंडळापुढें माडल्या होत्या. पण या मागण्यांना तेथील जमीनदारानीं तीव्र विरोध केला व काँग्रेस मंत्रिमंडळानें जर या मागण्या मान्य केल्या, तर आम्ही सत्याग्रह करूं व अनवस्थाप्रसंग ओढवेल, अशी धम

धमकी देण्यास जमीनदारानीं कमी केलें नाहीं. बिहारचे मंत्रिमंडळ बावचळून गेलें. तेव्हा काँग्रेसला पाठिंबा देण्यासाठींच व मंत्रिमंडळाचे हात • बळकट करण्यासाठींच हीं निदर्शनें काढलीं आहेत ही गोष्ट किसानसभेच्या लोकांनीं स्पष्ट केली आणि आपल्या मागण्या मंत्रिमंडळापुढें जोरदारपणें मांडण्यात मंत्रिमंडळाला विरोध करण्याचाही आपला हेतु नसल्याचें स्पष्ट केलें. उलट जनतेच्या संघटनेनें काँग्रेसचे हात बळकट करून जमीनदाराच्या धमकीला तोंड देण्यास काँग्रेसला समर्थ करण्याचा तो मार्ग होता. पण, सनदशीर प्रवृत्तीच्या काँग्रेसवाल्याना ही गोष्ट कळून आली नाहीं. त्याना वाटलें किसानसभा काँग्रेसविरोधी प्रचार करीत आहे म्हणून बिहारप्रांतिक काँग्रेस कमिटीनें व कांहीं जिल्हा काँग्रेस कमिट्यानीं काँग्रेस कार्यकर्त्यांनी किसान–सभेंत भाग घेऊं नये असें फर्मान काढलें व तसा ठराव पास करण्याचा प्रयत्न केला. पण, कितीतरी काँग्रेस–कार्यकर्ते किसान-सभेंत कार्य करीत होते, किसान-सभा त्यानीं वाढविली होती व काँग्रेसवर त्याची निष्ठा होती. तेव्हां बिहारच्या सुधारणावादी काँग्रेसवाल्याचा काँग्रेसमध्यें फूट पाडून सर्वत्र आपलें वर्चस्व कायम ठेवण्याचा हा डाव होता. अर्थात् जयप्रकाशना ही गोष्ट पसंत नव्हती व किसानसभेची भूमिका काँग्रेसवाल्याना पटवून देण्यासाठीं त्यानी जीवाचा आटापीटा केला. त्यावेळीं त्यानीं काँग्रेसची एकजूट मोडूं नका म्हणून बिहार प्रांतिक काँग्रेस-कमिटीपुढें एक अतिशय कळकळीचें भाषण केलें. त्यांत ते म्हणाले,

" काँग्रेस व किसानसभा याच्यामध्यें जो दुरावा येत चालला आहे, तो माझ्या मतें शक्य तितक्या लवकर नाहींसा केला पाहिजे.

किसान-चळवळीविरुद्ध प्रचार करणें किंवा ती चळवळ दडपून टाकण्याचा प्रयत्न केला पाहिजे असें म्हणणें हें अगदी अदूरदर्शीपणाचें ठरेल. ही चळवळ आपणाविरुद्ध नसून आपलेच हात बळकट करण्यासाठीं आहे. मंत्रिमंडळाचा पाठपुरावा बाहेर बहुजनसमाजाची चळवळ करूनच केला पाहिजे. जर या दोन्ही कार्यक्रमात एकसूत्रीपणा ठेवला, तर किसान चळवळीनें कॉंग्रेस कधींच कमजोर होणार नाहीं. उलट ही चळवळ कॉंग्रेसला अधिक बलवान करील. म्हणून यावेळीं किंवा केव्हाही किसान सभेवर हत्यार उपसून आपापसात फूट पाडणें मूर्खपणाचें ठरेल."

मंत्रिमंडळावर टीका करतांना किंवा दडपण आणताना कॉंग्रेसविरोधी प्रतिगामी शक्ति बळकट होणार नाहींत, याची पण जयप्रकाश काळजी घेत. याचें उदाहरण म्हणजे मुंबईच्या मंत्रि-मंडळानें पास केलेला बी. आय्. डी. ॲक्ट. या कायद्याअन्वयें मजुराच्या संप करण्याच्या हक्कावर काहीं बंधनें घातली होतीं. हीं बंधनें नाहीशीं करून कायद्यात सुधारणा करावी अशी कम्यु-निस्ट व समाजवादी या दोघांचीही मागणी होती. पण ती अमान्य झाली तेव्हा कम्युनिस्टानीं मंत्रिमंडळाविरुद्ध निदर्शनें करण्याचें ठरविलें. हीं निदर्शनें करताना त्यानी डॉ. अंबेडकरासारख्या प्रतिगामी लोकाचे साह्य घेण्यासही कमी केलें नाहीं. आणि गुंडाना दंगा करण्यास प्रवृत्त करण्याची नीच कारवाई पण कम्युनिस्टाचीच होती. व अशा रीतीनें कॉंग्रेसला बदनाम करण्याचा त्याचा कुटिल डाव होता. या असल्या डावात आम्ही सामील होणार नाहीं, अशी जयप्रकाशजीनीं स्पष्ट सूचना दिली आणि कॉंग्रेसला प्रतिगामी गुंडाच्या साहाय्यानें बदनाम करणें

म्हणजे राष्ट्रीय चळवळीची शक्ति खर्ची करणें होय व तें आत्मघातकीपणाचें ठरेल असें पण स्पष्टपणें बजावलें.

यावरून काँग्रेसची एकी कायम ठेवण्यासाठीं जयप्रकाश किती जपत होते हें दिसून येतें. पण त्याच वेळीं आपण घटना राबविण्यासाठीं मंत्रिपदें स्वीकारलीं नसून, ती घटना मोडण्यासाठीं स्वीकारलीं आहेत व म्हणून कायदे मंडळाच्या बाहेरच्या चळवळी या काँग्रेसला शक्तिमान करणाऱ्या आहेत, याची पण काँग्रेसजनांना त्यानीं स्पष्ट जाणीव दिली.

काँग्रेस-मंत्रिमंडळांच्या एकूण २७ महिन्यांच्या काळांत निवडणूक जाहीरनाम्यांत दिलेलीं आश्वासनें पुरीं करावींत, सर्व राजबंद्यांची मुक्तता करावी व साम्राज्यविरोधी आघाडी जोरदार करावी; तसेंच, काँग्रेसनें साम्राज्यसरकारच्या व नोकरशाहीच्या आहारीं जाता कामा नये म्हणून जयप्रकाश व त्यांचे सहकारी यांनीं स्पष्ट व सडेतोड टीका केली. जनतेचीं निदर्शनें घडवून आणून मंत्र्यावर दडपण आणलें. अ. भा. काँग्रेस कमिटीनें त्यांच्यावर टीका केली. पण हें सर्व आपुलकीच्या भावनेनें; कम्युनिस्टांप्रमाणें मंत्रिमंडळांना व पर्यायानें काँग्रेसला बदनाम करण्याचें नीच व संधिसाधू धोरण त्यानीं कधींच ठेवलें नाहीं. आणि आपलें उद्दिष्ट साध्य करताना काँग्रेसमध्यें दुफळी होणार नाहीं, साम्राज्यविरोधी फळी अखंड व अभंगच राहील या गोष्टीकडे त्यांनीं कधींच दुर्लक्ष केलें नाहीं.

हरिपुरा येथील अधिवेशनांत राष्ट्रीय एकजुटीसाठीं जयप्रकाशांची धडपड किती तळमळीची आहे हें स्पष्ट दिसून आलें. हरिपुरा अधिवेशनानंतर लवकरच "हरिपुरानें काय शिक-

वर्ले!" असा एक लेख लिहून त्यांनी आपली भूमिका पुन्हा एकवार स्पष्ट केली. "कॉंग्रेसमधील मवाळ व जहाल लोकांचे परस्परसंबंध कसे असावेत यासंबंधी हरिपुरा कॉंग्रेसने आपणाला एक नवी दिशा दाखविली आहे, हरिपुऱ्याने आपणास एक गंभीर सूचना दिली आहे, आपण आतापर्यंत एकजुटीचा व कॉंग्रेसच्या सर्वसामान्य कार्यकर्त्यांमध्ये एकवाक्यता ठेवण्याचा प्रयत्न करित होतो; पण इतके प्रयत्न करूनहि आपणाला मोठा आश्चर्यकारक दुरावा दिसून आला आणि आपल्या एकजुटीच्या कल्पनेला मोठाच धक्का बसला. जरी संकटसमयीं आपली शंभर टक्के निष्ठा आपण दाखवून दिली तरी आपणाबद्दल संशयाचे कटुतेचे व शत्रुत्वाचे वातावरण दिसून आलें. सरदार वल्लभभाई पटेलांचे हल्ले, श्री. जयरामदास दौलतराम व श्री. भुलाभाई देसाई यांचीं भाषणें आणि आचार्य कृपलानी यांनीं दिलेल्या धमक्या या सर्व गोष्टी काय दर्शवितात? आपण एकमेकापासून अपेक्षेपेक्षा दूर गेलों आहोंत आणि यामधून अंतीं कॉंग्रेसला घातक असा संघर्ष आल्याखेरीज राहाणार नाहीं......पण इतकें असूनही मी हें स्पष्ट करूं इच्छितों कीं, जर कॉंग्रेसची किंवा जहालांची शक्ति वाढवावयाची असेल, तर हा दुरावा नाहींसा करण्यासाठीं सर्व प्रयत्न केले पाहिजेत......आपल्या समोरचा आज सर्वांत महत्वाचा प्रश्न म्हणजे आपण कॉंग्रेसमध्यें एक गट म्हणून आपली ताकद कशी व किती वाढवतो हा नसून आपल्या प्रयत्नामुळें सर्वांच्या सर्व कॉंग्रेसची ताकद कशी व किती वाढते हा आहे. आपला कार्यक्रम फक्त आपल्याच करता असता कामा नये, तर सर्व कॉंग्रेसजनांचें लक्ष वेधण्याची ताकद त्यात असली पाहिजे."

या उताऱ्यावरून काँग्रेसची एकी अभंग ठेवण्याची जय-प्रकाशजींची धडपड किती होती हें स्पष्ट दिसतें.

आणि काँग्रेसनें राजीनामे दिल्यानंतर जयप्रकाशनीं आपलें हेंच धोरण पुढें चालू ठेवलें. काँग्रेसमध्यें फूट पडूं नये म्हणून त्यांनीं हरतऱ्हेचे प्रयत्न केले, पण आपलें ध्येय कायम राखलें. त्रिपुरीच्या अधिवेशनात त्यांच्या प्रयत्नाची खरी कसोटी होती. त्रिपुरीस महात्माजींच्या सल्ल्याविरुद्ध आणि त्यांच्या उमेदवारा-विरुद्ध सुभाषबाबू अध्यक्षपदाकरिता उभे राहिले. सुभाषबाबूंचे व जयप्रकाशजींचे संबंध फार जिव्हाळ्याचे होते. सुभाषबाबू तुरुंगातून सुटल्यानंतर जयप्रकाश त्यांना भेटले होते व पक्षाची भूमिका त्यांना समजावून सांगितली होती, आणि हरिपुरा अधिवेशनात त्यांनीं पक्षासंबंधीं गौरवपर उद्गार काढले होते. सुभाषबाबू म्हणाले होते,—

"काँग्रेस समाजवादी पक्षासारखा एखादा पक्ष काँग्रेसमध्यें असावा किंवा नाहीं या विषयावर बरेच मतभेद आहेत. मी कांहीं कॉ. समाजवादी पक्षाची तरफदारी करीत नाहीं, पण सुरवाती-पासून त्याच्या ध्येय-धोरणाशीं मी संमत आहे. सर्व जहाल लोकांनीं एका पक्षात संघटित व्हावें हें योग्यच होय. आणि अशा जहालांचा गट समाजवादाच्या भूमिकेवरच टिकूं शकतो... काँग्रेसच्या घटनेंत अशा पक्षाला स्थान आहे, मग त्याला पक्ष म्हणा, गट म्हणा किंवा काहींही म्हणा, पण समाजवादी पक्षाची आजची मुख्य भूमिका जहालांचे संघटण ही असावी. समाजवाद हा कांहीं तात्काळीचा प्रश्न नाहीं; पण तरीसुद्धा देशाची समाजवादासाठीं व राजकीय स्वातंत्र्यासाठीं तयारी करण्यासाठीं समाजवादी प्रचाराची फार जरूर आहे..."

त्यानंतर आपल्या अध्यक्षीय कारकीर्दीत सुभाषबाबूंनी कॉंग्रेस समाजवादी पक्षाच्या कार्याची ठिकठिकाणीं पहाणी करून त्याला बरीच सहानुभूति व मदत केली होती. त्यांच्या वर्किंग कमिटीतही श्री. जयप्रकाश, अच्युतरावप्रभृतींना फार महत्वाचें स्थान होतें. आणि आपल्या एक वर्षाच्या कारकीर्दीत त्यांचे व जयप्रकाश यांचे संबंधही फार जिव्हाळ्याचे झाले होते, आणि सुभाषबाबूंनी राजीनामा दिल्यानंतरही त्यांचे व जयप्रकाश यांचे संबंध सलोख्याचेच राहिले. व कम्युनिस्ट लोक सुभाषबोसावर जपानधार्जिणेपणाचा आरोप करीत असताना जयप्रकाशनीं सुभाषबाबूंची बाजू एका पत्रकाद्वारें ( अज्ञातवासांत असतांना ) उचलून धरली होती, असें लोकयुद्धात आलेल्या जयप्रकाश नारायण यांच्या दुसऱ्या पत्रकावरील उताऱ्यावरून स्पष्ट होतें.

सुभाषबाबू व पट्टाभी यांच्या सामन्यात अधिक जहाल व फेडरेशनला तीव्र विरोध करणारे म्हणून जयप्रकाशजींनी सुभाषबाबूंनाच पाठिंबा दिला आणि जहालांच्या पाठिंब्यावर व स्वतःच्या अतिशय लोकप्रियतेमुळें सुभाषबाबू निवडून आले; पण सुभाषबाबू निवडून आल्यानंतर त्रिपुरी येथें मोठा पेचप्रसंग निर्माण झाला.

या अधिवेशनांत पंडित पंतांनीं गांधीजींच्या नेतृत्वावर विश्वास ठेवणारा, व गांधीजींच्या सल्ल्याशिवाय अध्यक्षांनीं आपली वर्किंग कमिटी तयार करूं नये, असा ठराव मांडला. हा ठराव म्हणजे सुभाषबाबूंविरुद्ध सरळ अविश्वासाचा ठराव होता. सुभाषबाबूंची निवड म्हणजे कांहीं गांधीजींच्या नेतृत्वावर अविश्वास नव्हता; उलट, गांधीजीसंबंधीची आपली निष्ठा सुभाषबाबूंनी व्यक्त केलीच होती. पण यावेळीं कॉंग्रेसमध्यें फूट पडण्याचा प्रसंग

उभा होता. पंडित पंतांचें धोरण किंवा सर्वच गांधीवादी नेत्यांचें धोरण असेंच होतें व म्हणून विषयनियामक कमिटींत जयप्रकाशांनी व काँग्रेस-समाजवाद्यांनी त्या ठरावाला उघड विरोध केला; पण तरीहि पंडित पंतांनी तो ठराव उघड अधिवेशनांत मांडण्याचें ठरविलें. सुभाषबाबू किंवा पंडित पंत यांनी काहीं देशापुढें वेगवेगळे कार्यक्रम ठेवले नव्हते. अशा वेळीं पंडित पंतांचा ठराव नापास करणें म्हणजे गांधीवादी लोक काँग्रेसमधून बाहेर पडून काँग्रेसनी शक्ति खची करण्यासारखें होतें. पंडित पंतांच्या ठरावाला उघड विरोध करून तो पास झाला असता तरीहि, समाजवाद्यांना सुभाषबाबूंबरोबर बाहेर पडावें लागून तिकडून राष्ट्रीय ऐक्य-भंगाचा दोष त्यांना पत्करावा लागला असता. बरें; अशा ठरावाला पाठिंबा देणें तर अशक्यच होतें. तेव्हां या ठरावांत योग्य सुधारणा सुचविण्यासाठीं जयप्रकाश व अच्युतराव यांनीं दोन उपसूचना आणल्या; पण त्या दोन्ही

कलकत्ता येथें अ. भा. कॉंग्रेस कमिटीची बैठक भरली होती कारण, सुभाषबाबूंच्या आजारीपणामुळें वर्किंग कमिटी नेमण्याचा प्रश्न तसाच पुढें ढकलला गेला होता. तेथेंहि जयप्रकाशांनी एक तड-जोडीची योजना सुचविली होती व जहालांचे कांहीं प्रतिनिधी व गांधिवाद्यांचे प्रतिनिधी घेऊन वर्किंग कमिटी करावी असें सुच-विलें, पण दोघांनाही ती योजना नापसंत पडून शेवटीं सुभाष-बाबूंनीं राजिनामा दिला आणि नंतर ते कॉंग्रेसमधून बाहेरच पडले. अशा वेळीं समाजवाद्यांनीं जर सुभाषबाबूंचा पाठपुरावा करून बाहेर पडण्याचें ठरविलें असतें तर कॉंग्रेसमध्यें फारच मोठी दुफळी पडून राष्ट्रीय फळी खच्ची पडली असती. अशा वेळीं आपल्या दूरदर्शीपणामुळें कॉंग्रेसमध्यें होणारी मोठी दुफळी जय-प्रकाशबाबूंनीं टाळली, याबद्दल त्याचा गौरव करावा तेवढा

## ६. समाजवादी एकजुटीचे फोल प्रयत्न

हिंदी राजकीय स्वातंत्र्याच्या चळवळींत जयप्रकाशजींचे आणखी एक स्वप्न होतें. तें म्हणजे 'समाजवादी एकजूट' घडवून आणणें. ही समाजवादी एकजूट म्हणजे काय आणि ती घडवून आणण्यासाठीं जयप्रकाशजींनीं काय काय प्रयत्न केले आणि शेवटीं ते कां व कसे निष्फळ झाले हें पहाणें अत्यंत जरूर आहे. मार्क्सवादाचा पुरस्कार करणाऱ्या निरनिराळ्या घटकाना व कार्यकर्त्यांना एका पक्षात एकत्र आणावें आणि समाजवादी चळवळीचे व साम्राज्यविरोधी आघाडीचे बळ वाढवावें अशी जयप्रकाशजींची कल्पना होती.

काँग्रेस समाजवादी पक्ष स्थापन झाला तेव्हा मार्क्सवादाचा पुरस्कार करणारे अखिल भारतीय स्वरूपाचे आणखी दोन पक्ष हिंदुस्थानात होते. ते म्हणजे 'कम्युनिस्ट पक्ष' व 'रॉयचा पक्ष' हे होत. याशिवाय पंजाब समाजवादी पक्ष व बंगाल मजूर पक्ष नावाचे दोन पक्ष त्या त्या प्रांतापुरते अस्तित्वात होते. या सर्वांना एकत्र आणून त्यांचा एक संघटित समाजवादी पक्ष निर्माण करण्याची जयप्रकाशजींची महत्त्वाकांक्षा होती. पण या प्रयत्नात अंतीं त्यांना संपूर्ण अपयश आलें. पण, या त्यांच्या महत्वाकांक्षेमागें जोरदार प्रेरणा नव्हती किंवा भरपूर प्रयत्नाचा अभाव होता म्हणून हें अपयश आलें असें नाहीं, तर इतर पक्षांची, विशेषतः कम्युनिस्टांची गटवादी व विध्वंसक वृत्तीच त्याला कारणीभूत झाली.

या सर्व अपयशाच्या इतिहासाचें समालोचन करतांना प्रथम रॉयपंथाचा विचार केला पाहिजे. कॉं. समाजवादी पक्षाच्या स्थापनेचें सर्व रॉयवाद्यनीं मोठ्या उत्साहानें स्वागत केलें आणि ते त्या पक्षाचे सभासद झाले आणि निदान तीनपैकीं दोन तरी गटात एकी होणार अशी आशा जयप्रकाशजींना वाटूं लागली. पण जयप्रकाशजींच्या दुर्दैवानें ती घटना अल्पायुषी ठरली. हें असें का घडलें याचा विचार करताना एका मूलभूत गोष्टीचा उल्लेख करणें जरूर आहे. राष्ट्रीय चळवळीच्या गाभ्यातून जयप्रकाश, अच्युत याचा समाजवादी पक्ष निर्माण झाला होता व त्यामुळें त्या पक्षाला अत्यंत महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें होतें व म्हणून रॉयवाद्यानी व कम्युनिस्टानीं कॅांग्रेस समाजवादी पक्षच ताब्यात घेण्याचें सत्तालोभाचें धोरण आखून पक्षाच्या प्रतिष्ठेचा फायदा घेण्याचा प्रयत्न केला व जेव्हा हें साध्य झालें नाहीं, तेव्हा कॅांग्रेस समाजवादी पक्षात फाटाफूट पाडून किंवा अन्य मार्गांनीं तो पक्षच मोडून टाकण्याचा प्रयत्न त्यानीं केला

सुरवातीस रॉयवाद्यानी जयप्रकाशचें धोरण सर्वस्वी मान्य केलें. पण पुढच्याच वर्षी १९३६ साली मीरत परिषदेपूर्वी थोडे दिवस काहीं मतभेद व्यक्त होऊ लागले. पक्षाची संघटना समाजवादी पक्ष म्हणून न करता कॅांग्रेसमधील डावा गट म्हणून करावी असें ते म्हणूं लागले. याच्या मुळाशीं दुसरी एक कल्पना होती. केवळ आपलाच पक्ष काय तो खरा मार्क्सवादी पक्ष आहे आणि इतर पक्ष हे आपल्या कामाकरता वापरले पाहिजेत ही रॉयवाद्याची व कम्युनिस्टाची हास्यास्पद कल्पना एकजुटीच्या मार्गांत येत होती व म्हणून ज्यात स्वतःला आपलें प्रभुत्व

गाजवतां येईल, अशी शाव्यांची संघटना करण्याचा सूर ते काढीत होते. जयप्रकाशजींना कम्युनिस्टांचा व रॉयवाद्यांचा हा दुष्ट डाव प्रथमच उमगला नाहीं. समाजवादी एकजुटीच्या कल्पनेनें ते इतके भारले गेले होते कीं, आपणाप्रमाणेच इतरही त्यासाठींच प्रामाणिक प्रयत्न करीत असले पाहिजेत, अशी त्यांची कल्पना झाली होती.

मीरतच्या परिषदेपूर्वी 'डाव्या गटाची संघटना करा' अशा अर्थाचें एक पत्रक रॉयवाद्यांनीं काढलें. पण मीरत येथें झालेल्या कार्यकारी मंडळाच्या सभेत मंडळातील दोन रॉयवादी सभासदांनी ती भूमिका साफ नाकारली. पण परिषदेंत मात्र उपसूचना आणून कांहींनीं या पत्रकाला पाठींबा देण्याचा प्रयत्न केला. तथापि त्यांत त्यांचा पराभव झाला व त्यानंतर मात्र रॉयगट पणू कांहीं पश्चात पूर्णपणें सामील झाल्याचा आव आणून काम करूं लागला.

बाद येथें जाऊन भेटले होते आणि रॉय याच्या तेव्हाच्या बोलण्याचा व त्याच्या जाहीर लिहिण्याचा मेळ कसा घालावा हेंच त्याना समजेना. म्हणून जयप्रकाशजी पुन्हा रॉयना भेटले. तेव्हां रॉयचावूनीं मोठ्या मानभावीपणानें सांगितल कीं, आपलें अलाहाबाद येथें बोलणें झालें तेंच खरें - तेव्हा जयप्रकाशानी एक सुटकेचा निश्वास टाकला पण ही भावना फार काळ टिकली नाहीं १९३७ साली दिल्ली येथें पक्षाची परिषद भरली होती, तव्हा आपल्या अनुयायाना पक्षातून काढून घेण्याचा गुप्त निर्णय त्यानीं घेतला त्यानी हा निर्णय का घेतला याचा खुलासा कधींच केला नाहीं कदाचित् कीं समाजवादी पक्ष आपल्या हातातील खेळणें होण्यास तयार नाहीं, हें त्याना कळून चुकलें असावें

कारणपरपरा काहीही असो थोड्याच दिवसांत रॉयवादी एकामागून एक पक्षातून बाहेर पडले आणि त्यानतर समाजवादी पक्षाची बदनामी करणें हा एकच कार्यक्रम त्याच्यापुढें राहिला. पक्ष ताब्यात घेता येत नाहीं तर तो मोडून तरी टाकू या, असा नीच निर्णय त्यानीं घेतला व अशा रीतीनें दीड वर्ष प्रयत्न करून जयप्रकाशानी साधलेला एक दुवा तळकन् तुटून पडला

त्यानतर बगाल व पजाबमधील गटाशीं एकजूट करण्यांचे पण जयप्रकाशानी प्रयत्न केले पैकीं बगाल मजूर-पक्षानें कधीं समाजवादी पक्षात, तर कधी कम्युनिस्ट पक्षात तर कधीं पुरोगामी गटात अशा अनेक उड्या मारल्यामुळें त्याना समाजवादी पक्षात सामील करणें फारच कठीण होतें पजाब समाजवादी पक्षाला आपल्या पक्षात पूर्णपणें सामील करून घेण्यात मात्र जयप्रकाशानीं संपूर्ण यश संपादन केलें.

येथून पुढें एकजुटीच्या प्रयत्नांचा इतिहास म्हणजे कम्युनिस्टांनी वेळोवेळी उलट्यापालट्या उड्या मारून कधीं समाजवादी पक्ष काबीज करण्याचें, कधीं बदनाम करण्याचें, तर कधीं मोडून टाकण्याचे जे प्रयत्न केले आणि जयप्रकाशसारख्यांच्या अमोल शक्तीचा जो अपव्यय केला त्या दुर्दैवी घटनेचा इतिहास होय. कम्युनिस्ट पार्टीनें प्रथमपासून समाजवादी पक्षाशीं शत्रुत्व पत्करलें होतें, तरीसुद्धां जयप्रकाशनी सहकार्याचा व ऐक्याचा हात पुढें केला होता. यावरून समाजवादी एकजुटीबद्दल त्यांची तळमळ किती तीव्र होती हें सिद्ध होतें.

सुरुवातीसच "मांडवलदारांनी घेतलेले बहाल सोंग" व 'सोशल फॅसिस्ट' वगैरे कम्युनिस्ट परिपाठांतील शिव्या देऊनच कम्युनिस्टांनी समाजवादी पक्षाची संभावना केली. कारण, सर्व जगांत कम्युनिस्टांनी गटबाजीचें राजकारण अंगिकारलेलें होतें.

येथें ही गोष्ट स्पष्ट केली पाहिजे कीं, कम्युनिस्टांना स्वतःचें धोरण ठरविण्याची मुभा नाहीं. त्यांचें सर्व धोरण मॉस्कोला ठरतें आणि तेथून सुटलेल्या फर्मानाप्रमाणें वागणें हें या बंदा गुलामांचें कर्तव्य ठरतें. आणि म्हणूनच सुरुवातीस त्यांनी समाजवादी पक्षास विरोध केला.

आपल्या गटबाजीच्या धोरणास अनुसरून त्यावेळीं कम्युनिस्टांनी स्वतंत्र लाल ट्रेडयुनियन कॉंग्रेस स्थापन केली होती. जयप्रकाशजींनी आपल्या सहकाऱ्यांच्या मदतीनें कामगार चळवळींत एकजूट घडवून आणण्याच्या कामीं पुढाकार घेतला व संयुक्त आघाडीच्या योजनेवर सही करण्यास लाल ट्रेड युनियन कॉंग्रेसचें मन वळविलें, संयुक्त निदर्शनें करणें व परस्परांवर हल्ले करण्याचें थांबविणें या गोष्टी दोघानी मान्य केल्या; पण एवढा मर्यादित समेटही कम्युनिस्टांनीं पाळला नाहीं. आणि संयुक्त जाहीरनाम्याचा उपयोग कोणीही पक्षप्रचारासाठीं करूं नये हे कलम पण पाळलें नाहीं व आपलें जुनें गटबाजीचें धोरण तसेंच चालू ठेवलें.

या ठिकाणीं कॉं. समाजवादी पक्ष व कम्युनिस्ट पक्ष यामधील मूलभूत फरक कोणते होते ते लक्षात घेणें अवश्य आहे. तिसऱ्या इंटरनॅशनलच्या धोरणाचा (पर्यायानें रशियन परराष्ट्रीय राजकारणाचा) पुरस्कार करणारी एक शाखा इतकेंच कम्युनिस्ट पार्टीचें स्वरूप होतें. कम्युनिस्ट पार्टी ही कॉंग्रेसच्या बाहेर होती व अल्पायुषी ठरलेला शेतकरी–कामकरी पक्ष आणि उपजताच मेलेली साम्राज्यशाही–विरोधी लीग अशा कॉंग्रेसला प्रतिस्पर्धि संस्था निर्माण करण्याचें काम कम्युनिस्ट पार्टी करीत होती. तर, उलट तिसऱ्या इंटरनॅशनलच्या या धोरणाला विरोध करून जयप्रकाशनी कॉंग्रेसला पाठिंबा दिला आणि राष्ट्रीय लढ्याचें एकमेव साधन म्हणून कॉंग्रेस अधिक बळकट केली पाहिजे असें त्यांनीं धोरण आखलें. तिसरा फरक कामगार चळवळीबाबत होता. कामगार चळवळींत कम्युनिस्टांनीं

आपला स्वतंत्र गुप्त निर्माण केला होता आणि हिंदी कामगार चळवळीत फूट पाडली होती. उलट जयप्रकाश आणि त्यांचा पक्ष यांचा कामगार-चळवळीच्या ऐक्यावर पूर्ण विश्वास होता व त्यांनी त्या दृष्टीनें प्रयत्न पण केले होते कम्युनिस्ट पक्षाचें म्हणणें असें होतें कीं, आपणच फक्त खरे मार्क्सवादाचे मक्तेदार आहोंत व मार्क्सवादी म्हणून जिवंत राहाण्याचा अधिकार फक्त आपणालाच आहे, म्हणून इतर सर्वांशीं शत्रुत्वाचें नातें त्यांनी पत्करलें होतें. उलट सर्व समाजवादी गटांशीं सहकार्य करावें व त्यामधून संघटित असा एक समाजवादी पक्ष स्थापन करावा, हें जयप्रकाशजींच्या धोरणाचें सूत्र होतें कीं. समाजवादी हे मार्क्सवादीच नव्हत, त भांडवलदारांचें चहाल सोंग आहेत, काँग्रेस ही भांडवलदारांची हस्तक आहे असा प्रचार करून समाजवादी एकजूट मोडण्यचे प्रयत्न कम्युनिस्टांनीं चालविले होते

कम्युनिस्टांच्या या विरोधामुळें त्यांना पक्षात सामील करून घेऊ नय, असा निर्णय कीं. स. पक्षाच्या कार्यकारी मंडळानें मुदईस घेतला होता. असें असूनही हळूहळू कम्युनिस्टांना आपल्यात घ्यावयाचे, त्यांच्याशीं सहकार्य करून दोन्ही पक्ष एक होतील अशी परिस्थिति निर्माण करावयाची, व मुदईचा निर्बंध निरुपयोगी ठरवायचा, असें धोरण जयप्रकाशजींच्या आग्रहास्तव कार्यकारी मंडळानें स्वीकारलें होतें ही भूमिका एक वर्षभर चालू होती; मध्यतरीं, इंटरनॅशनलची ७ वी काँग्रेस भरून त्यांनीं सर्वत्र फॅसिसमविरोधी संयुक्त आघाड्यांचें धोरण जाहीर केलें. अर्थात् हिंदी कम्युनिस्ट पण उलटे पवित्रे टाकू लागलें, व म्हणून १९३६-साली

मीरत येथें कॉं. समाजवादी पक्षानें, जयप्रकाशजींचा अहवाल विचारात घेऊन अधिकृतपणें कार्यकारी मंडळाच्या नियंत्रणाखालीं पक्षाचे दरवाजे कम्युनिस्टांना खुले केले. जयप्रकाशजींनीं स्वयंस्फूर्तीनें पुढें केलेल्या ह्या सहकार्याचा हात कम्युनिस्टांनीं आपलेपणानें स्वीकारावयास पाहिजे होता.

मीरतच्या बैठकीनंतर पुष्कळसे कम्युनिस्ट समाजवादी पक्षांत सामिल झाले. कार्यकारी मंडळाच्या परवानगीबाबतसुद्धा जयप्रकाशनी ढिलाईचेंच धोरण स्वीकारलें, कारण तांत्रिकतेवर भर देऊन मार्गांत विघाड आणण्याची त्यांची इच्छा नव्हती पण वस्तुतः ती चूक झाली कारण जसजसे जास्त कम्युनिस्ट स. पक्षात येऊं लागले, तसतसे पक्षाच्या धोरणाशीं विसवादी सूर निघूं लागले स. पक्षात अंतर्गत फूट पाडण्याचे व संबंध समाजवादी पक्षाची संघटना कावीज करण्याचे प्रयत्न कम्युनिस्ट लोक करूं लागले तसेंच, कामगार चळवळींत आम्ही कोणालाही पाय रोवूं देणार नाहीं अशा वढाया कम्युनिस्ट लोक मारीत असत आणि विशेषतः समाजवाद्यांना कामगार चळवळीपासून दूर ठेवण्यासाठीं आंबेडकरप्रभृति प्रतिगाम्यांशीं व सुधारणावादी लोकांशीं सहकार्य करण्याचा निर्लज्जपणा करण्यासही कम्युनिस्टांनी कमी केलें नाहीं.

अशा परिस्थितींत कांहीं दिवस गेल्यानंतर एक आश्चर्यकारक घटना घडून आली. १९३७ च्या ऑगस्टमध्यें पाटणा येथें कॉं स. पक्षाच्या कार्यकारी मंडळाच्या बैठकींत कम्युनिस्टांचें एक गुप्त पत्रक वाचण्यात आलें त्याचा आशय असा होता कीं, कम्युनिस्टांनीं हिंदुस्थानांत, स्वतःखेरीज कोणत्याही समाजवादी पक्षाचें

अस्तित्व टिकूं देता कामा नये. कम्युनिस्ट हाच खरा समाजवादी पक्ष आहे व देशातील बहाल लोकाना एकत्र आणण्याचें व्यासपीठ म्हणूनच कॉं. समाजवादी पक्षाचा उपयोग करावा.

या पत्रकामुळें पूर्वी लखनौ येथें झालेल्या कराराचा पायाच ढासळला गेला. जयप्रकाश हे स्वतः 'समाजवादी एकजुटी'बद्दल कितीही प्रामाणिक असले तरी कम्युनिस्ट आपलें धोरण बदलण्यास तयार नव्हते. किंबहुना, समाजवादी एकजुटीवर त्यांचा विश्वासच नव्हता. कॉंग्रेस समाजवादी पक्षांत शिरून समाजवादाच्या राजकीय प्रतिष्ठेचा भरपूर फायदा करून घ्यावयाचा आणि 'समाजवादी ऐक्य' या घोषणेचा उपयोग करून घेऊन समाजवादी पक्षाला डाव्यांचें व्यासपीठ बनवावयाचें व त्यावर आपलें वर्चस्व स्थापन करावयाचें हीच त्यांची मनीषा होती.

जयप्रकाशजींना या पत्रकामुळें मोठाच धक्का बसला. कम्युनिस्टांच्या या पत्रकाबद्दल त्याना तीव्र तिरस्कार वाटला. पक्षाच्या कार्यकारी मंडळात कम्युनिस्टांचे चार वीर होते. त्यांनी पण तिरस्काराचें सोंग आणलें व कम्युनिस्टाना समाजवादी पक्षात घेऊं नये असा एकमुखी निर्णय घेण्यात आला. पक्षसंघटनेच्या दृष्टीनें सर्व कम्युनिस्टाना तावडतोब हाकलून देणें जरूर होतें. तुर्तेच नवीन लोकाना बंदी करून भागण्यासारखें नव्हतें. पण, जयप्रकाशांची व समाजवादी पक्षाच्या कार्यकारी मंडळाची समाजवादी ऐक्याची तळमळ इतकी तीव्र होती की फक्त नवीन कम्युनिस्टांना बंदी करण्याचा सौम्य निर्णय घेऊनच ते थांबले. कारण, कम्युनिस्टांपैकी कांहींना तरी

समाजवादी ऐक्याची जरुरी वाटत असावी असा त्याचा भोळा विश्वास होता.

पण, ऑगस्ट १९३७ नंतर कम्युनिस्टांच्या इतर अनेक कारवाया लक्षांत आल्यामुळें त्याना पक्षांतून काढून टाकणें हेंच क्रमप्राप्त ठरलें. मोठ्या आशेनें उराशी बाळगलेली समाजवादी ऐक्याची आवडती कल्पना जयप्रकाशांना सोडून द्यावी लागली.

पण, १९३८ सालच्या एप्रिल महिन्यांत कम्युनिस्टांनीं एक मोठी हिकमत करण्याचा प्रयत्न केला. त्यावेळीं भरलेल्या समाजवादी पक्षाच्या कार्यकारी मंडळास एक पत्र पाठवून कॉं. समाजवादी पक्ष हा खरोखर क्रान्तिकारक पक्ष असून, कम्युनिस्ट पक्ष व समाजवादी पक्ष यांच्या एकजुटीमुळें समाजवादी ऐक्य निर्माण होईल असें कम्युनिस्ट पक्षाला वाटत असल्याचें त्या पत्रांत स्पष्टपणें नमूद केलें होतें. पाठण्यानंतर अवघ्या आठ महिन्यांत कम्युनिस्टांनीं ही विदूषकी कोलांटी मारली. जहालाचें व्यासपीठ असलेला समाजवादी पक्ष एकदम मार्क्सवादी क्रान्तिकारक पक्ष ठरला. पण, आता जयप्रकाश व त्यांचे सहकारी फसले नाहींत. कम्युनिस्टांच्या पत्राचा उद्देश स्पष्ट होता. त्यांना आता भीति वाटूं लागली होती. कम्युनिस्टांच्या कारवाईबद्दल कार्यकारी मंडळाच्या सर्व सभासदांस तिरस्कार वाटूं लागला होता. श्री. मसानी यांनी तर कम्युनिस्टांना एकजात हांकलून द्यावें अशी योजना मांडली होती; पण समाजवादी ऐक्याचें ध्येय अजूनही नजरेपुढें असल्यामुळें कार्यकारी मंडळानें दुबळें धोरण स्वीकारलें. जे कम्युनिस्ट पक्षाचे सभासद होते, त्यांचे सभासदत्व तसेंच चालू ठेवलें आणि प्रत्यक्ष कार्यक्रमांत 'ऐक्य'

हें घोषवाक्य पुढें केलें पण कार्यकारी मंडळाचा एकंदर दुबळे-पणा, सर्व कम्युनिस्टाना हांकलून देण्याचा अप्रिय निर्णय घेण्याची टाळाटाळ, यामुळें समाजवादी पक्षाच्या घसरगुंडीला सुरवात झाली। कम्युनिस्ट एकीकडे ऐक्याची भाषा बोलत होते, तर दुसरीकडे पक्षाचा कबजा घेण्याच्या त्याच्या कारवाया सुरूच होत्या आणि लाहोर परिषदेनंतर थोड्याच दिवसात याचा एक *आश्चर्यकारक पुरावा सापडला कम्युनिस्ट पक्षानें आपल्या* समासदाना पाठविलेले एक गुप्तपत्रक श्री. मसानी यांच्या हातीं पडलें व 'समाजवादी पक्षाविरुद्ध कम्युनिस्टाचा कट' म्हणून मसानींनी तें छापून काढलें. कॉंग्रेस समाजवादी पक्षाचा ताबा घेण्यासाठी निरनिराळ्या प्रांतात कम्युनिस्टांनीं कोणत्या कारवाया करावयाच्या याच्या योजना त्या पत्रात होत्या. हें पत्रक म्हणजे जय-प्रकाश प्रभृति पुढाऱ्यांच्या डोळ्यात चांगलेच झणझणीत अंजन होतें पण, *तरीही काहीं काळ पूर्वीची परिस्थितीच कायम राहिली.* पक्षाच्या कार्यकारी मंडळानें कोणत हि ठाम निर्णय घेतला नाहीं व पुष्कळच गोंधळ माजला, आणि समाजवादी पक्ष अगदीं कमजोर बनला

या कोंडींतून सुटण्याचे दोनच मार्ग होते. एक म्हणजे कॉं *समाजवादी पक्ष व कम्युनिस्ट पक्ष या दोन्हींचा एक पक्ष करणें,* किंवा इतर सर्वांना हाकून देऊन एकजिनसी कॉं. स पक्ष तयार करणें पहिला मार्ग अशक्य होता, पण जयप्रकाशजींचा अजून कम्युनिस्टांवर विश्वास होता तो उडावयास आणखी कालावधि लागला ऐक्याचा तात्त्विक पाया काय असावा, याची चर्चा करण्यासाठी त्यांनीं कम्युनिस्ट पुढाऱ्यांशीं बोलणीं सुरू केलीं.

पण, ही बोलणी चालू असतानाच दैनंदिन राजकारणात परस्पराचे विरोध वाढतच गेले. यानंतर त्रिपुरी व कलकत्त्याच्या अविस्मरणीय घटना झाल्या. राष्ट्रीय चळवळींत कम्युनिस्टांना स्वतंत्र स्थान नसल्यामुळें ते बावरल्यासारखें झालें आणि जहालाचे पुढारीपण करण्याची आपली हाव पुरी करण्यासाठीं ते नुसत्या प्रचंड घोषणा करीत सुटले.

यानंतर १९३९ सालीं मुंबई येथें समाजवादी पक्षाच्या कार्यकारी मंडळाची एक महत्त्वपूर्ण बैठक झाली, आणि कम्युनिस्ट किंवा इतर पक्षाच्या सभासदास पक्षांतून राजीनामा देण्यास सांगावें असेंच मत सर्वांनीं दिलें. व नंतर जनरल सेक्रेटरी म्हणून हा प्रश्न जयप्रकाशजींवेवर सोंपवण्यांत आला व तडजोडीच्या स्वरूपाचा एक निर्णय त्यांनीं कार्यकारी मंडळापुढें ठेवला. एकजिनसी पक्ष असावा ही कल्पना आपणास पूर्णपणें पटल्याचें त्यांनीं मान्य केलें; पण त्याच क्षणला सर्व कम्युनिस्टाना काढून न टाकता समाजवादी पक्षाचीं सर्व सूत्रें फक्त समाजवादी पक्षाचे लोकाचे हातीं यावीत यावर त्यांनीं भर दिला. पण कम्युनिस्टांना संपूर्णपणें हाकलण्याचें स्पष्ट धोरण कांहीं अंगिकारलें नाही. बिचकत बिचकत निर्णय घ्यावयाचे आणि त्याहीपेक्षा बिचकत त्याचीं अंमलबजावणी करावयाची, या धोरणानें समाजवादी ऐक्य तर साधलें नाहींच, पण समाजवादी पक्ष मात्र फारच कमजोर झाला.

१९३९ साली युद्ध सुरू होईपर्यंत समाजवादी ऐक्याचा असा बोजवारा उडाला. युद्ध सुरू झाल्यावर तर कम्युनिस्ट पक्ष हा कॉंग्रेस समाजवादी पक्ष, पुरोगामी गट व कॉंग्रेस याच्याविरुद्ध

दर योपट्टनच उभा राहिला. युद्ध सुरू झाल्यावर अलाहाबाद येथें श्री. सुभाषचंद्र बोस यांचे अध्यक्षतेखालीं एक अहालाची परिषद भरली होती आणि युद्धविरोधी प्रचारासाठीं एक सर्वसंमत कार्यक्रम आखून तो सर्वांनीं सहकार्यानें पार पाडावा असें ठरलें, आणि ती गोष्ट हजर असलेल्या सर्व प्रतिनिधींनीं मान्य केली. पण ही बैठक संपल्यावर तीन आठवड्यांच्या आतच काँ. समाजवादी पक्षावर जोरदार हल्ला करणारा एक प्रबंध कम्युनिस्टांनीं प्रसिद्ध केला. त्यात गांधीजी हे साम्राज्य सरकारपुढें शरण आले असून काँग्रेस समाजवादी हे गांधींना शरण गेले आहेत अशी विचारसरणी मांडली होती. आणि १९४० च्या सुरवातीस तर फक्त कम्युनिस्टांनाच साथेल अशा परिभाषेंत काँग्रेस समाजवादी पक्ष मेला म्हणून एक दुखवट्याचा (का आनंदाचा!) समारंभ पण कम्युनिस्टांनीं एका पत्रकाद्वारें पार पाडला.

११

युद्ध सुरू झाल्याबरोबर ज्यांतीही पाठोपाठ येणारच, तेव्हां अशा या ऐतिहासिक घटनेचे वेळीं फक्त कम्युनिस्टच काय तो क्रांतिकारी पक्ष आहे असें भासवण्यासाठीं प्रचंड अद्दल गर्जना करून इतर पक्षांना शिव्या देण्याचें ज्ञाति कार्य कम्युनिस्टांनीं चालू ठेवलें तेव्हां रामगड येथें दुसरा मार्गच न उरल्यामुळें कम्युनिस्टांना व त्यांच्या हस्तकांना पक्षातून घालवून देण्याचा निर्णय समाजवादी पक्षाच्या कार्यकारी मंडळाला घ्यावा लागला व हिंदी समाजवादी चळवळींतील एका दुःखकारक प्रकरणाची समाप्ति झाली.

## ७. जयप्रकाश व महायुद्ध

१९३९ च्या सप्टेंबरमध्ये युरोपीय युद्ध सुरू झाल्यावर, तर जयप्रकाशजींच्या पुढें फार मोठा पेंचप्रसंग उभा राहिला. हें युद्ध साम्राज्यशाही युद्ध आहे व आपण त्याला विरोध केला पाहिजे, ही भूमिका त्यांनीं सुरवातीपासूनच घेतली होती. कॉंग्रेसनें पण संपूर्णपणें साम्राज्यविरोधी धोरण स्वीकारावें अशी त्यांची इच्छा होती. पण कॉंग्रेसनें ब्रिटीशाना आपले युद्धहेतू जाहीर करण्याचें आव्हान दिलें. पण ब्रिटिशानीं आपले युद्धहेतू स्पष्टपणें जाहीर केले नाहींत व काहीं दिवसानीं कॉंग्रेस मंत्रिमंडळानीं राजीनामे दिले व असहकाराचें धोरण स्वीकारलें. यानंतरच्या काहीं दिवसात गांधीजींनीं पुढील तीन मुद्यावर विशेष भर दिला. (१) दोस्त राष्ट्राबद्दल सहानुभूति व त्याना अडचणींत न टाकण्याची जबाबदारी. (२) जातीय समेटाची आवश्यकता. (३) अहिंसक लढ्याची पूर्वतयारी म्हणून विधायक कार्यक्रमावर भर. जातीय दंग्यांच्या हिंसक वातावरणात सत्याग्रह सुरू केल्यानें अराजक माजेल व सत्याग्रह सुरू केला तर ब्रिटिश राज्याला व युद्धप्रयत्नांना धोका पोंचेल म्हणून सत्याग्रह नको, असें त्याचें म्हणणें होतें. गांधीजींची ही विचारसरणी, जयप्रकाश, जवाहरलालजी, सुभाषबाबू व कम्युनिस्ट या सर्वांनाच नामंजूर होती व सामुदायिक चळवळ तावडतोब सुरू करावी असें त्यानीं म्हणणें होतें. पण, ही सामुदायिक चळवळ कॉंग्रेसच्या

नेतृत्वाखालीं झाली, तरच प्रभावी व यशस्वी होऊं शकेल असें जयप्रकाश व समाजवाद्यांचें म्हणणें होतें व काँग्रेसनें लढ्याच्या बाबतींत जी चालढकल चालविली होती, तिच्यावर टीका करतानासुद्धा ही गोष्ट ते विसरले नव्हते.

युद्धाबाबत काँग्रेसमध्यें एकूण तीन भूमिका होत्या. एक गांधीजींची दोस्ताना नैतिक पाठिंब्याची, दुसरी समाजवाद्यांची युद्धविरोधाची आणि तिसरी वर्किंग कमिटीची सशर्त सहकाराची. ब्रिटिशांनीं आपलें युद्धहेतू जाहीर करून साम्राज्यनाश केला, तर मदत करण्याचें आश्वासन वर्किंग कमिटीनें दिलें होतें. त्यावेळीं कॉमिन्टर्नचा 'युद्धविरोधी' आदेश आल्यावर कम्युनिस्टांनीं जहाल आरोळ्या मारण्यास सुरवात केली. मागील पांच वर्षांतील फॅसिस्टविरोधी घोषणा विसरून काँग्रेसशीं व समाजवादी लोकांशीं ऐक्य करण्याची त्यांची भाषा बंद पडली व काँग्रेसवर, गांधींवर आणि समाजवाद्यांवर व सुभाषबाबूंवर प्रखर टीका करणारें एक 'राजकारण व पक्षोपपक्षांचें सत्यस्वरूप' या नांवाचें चोपडें प्रसिद्ध केलें. या चोपड्यांत वरील सर्वांना शिवराळ शिव्या देण्यांत आल्या होत्या. सुभाषबाबूंना जहाल भाषा बोलणारा भाडवल-वाल्यांचा पुढारी, गांधीजींना भांडवलदारांचे प्रतिगामी पुढारी व साम्राज्यशाहीचे हस्तक आणि समाजवाद्यांना गांधीजीपुढें नांगी टाकणारे अशीं शेलकीं विशेषणें दिलीं होतीं.

जयप्रकाशांनीं डिसेंबर १९३९ मध्यें एक पत्रक काढून आपलें धोरण प्रसिद्ध केलें. काँग्रेसच्या धोरणाशीं आपली युद्धविरोधी भूमिका जुळवून घेण्यासाठीं त्यांनीं पुढील कार्यक्रम दिला. (१) युद्धविरोधी प्रचार करणें व त्यासाठीं काँग्रेस कमिट्यांना

कार्यक्षम बनवणे. ( २ ) ज्या ठिकाणीं भाषण-स्वातंत्र्यावर बंधनें घातलीं होतीं, तीं मोडणें. ( ३ ) स्वयंसेवक संघटना जोरदार करणें. ( ४ ) किसान कामगारांची संघटना चालू ठेवणें. याच पत्रकात कम्युनिस्टांच्या कॉंग्रेसविरोधी प्रचाराबाबत आणि स्वतंत्रपणें लढा सुरू करण्याच्या मूर्ख कल्पनेबाबत जयप्रकाशांनीं स्पष्ट इशारा दिला होता; व आज कितीही लोक लढ्याला उत्सुक असले, तरी कॉंग्रेस जोंवर लढा सुरु करीत नाहीं, तोंवर घाई करणें मूर्खपणाचें ठरेल, असें पण त्यांनीं स्पष्टपणें बजावलें होतें. आणि कॉंग्रेसवर लढ्यासाठीं दडपण आणणें व तोंवर किसान कामगारांची लढ्यासाठीं तयारी करणें, हा कार्यक्रम त्यांनीं आपल्या सर्व सहकाऱ्यांपुढें ठेवला होता. समाजवाद्यांनीं धिसाडघाई न करता सर्व साम्राज्यविरोधकांशीं एकजुटीनें लढा केला पाहिजे. हा लढा गांधीजींच्या नेतृत्वाखालींच होणार, तेव्हा गांधीजींचें नेतृत्व व तंत्र पण मान्य करणें अपरिहार्य आहे. ही जयप्रकाशजींची युद्धनीति होती. आणि याच धोरणानें त्यांनीं मौलाना आझादांच्या निवडणुकीला पाठिंबा दिला. रामगड कॉंग्रेसचें अधिवेशन मार्च १९४० मध्यें भरणार होतें. तत्पूर्वी जयप्रकाश व नरेंद्र देव यांनीं गांधीजींची भेट घेतली व त्यानून आशेचें वातावरण निर्माण झालें होतें. रामगडला कॉंग्रेस लढ्याचा निर्णय घेणार असा रागरंग दिसूं लागला होता; पण याच सुमारास जमशेदपूर येथें केलेल्या एका युद्धविरोधी भाषणाबद्दल जयप्रकाश यांना अटक करण्यात आली. जयप्रकाशजींच्या या अटकेचा गांधीजींनीं (हरिजन)मध्यें लेख लिहून निषेध केला व जयप्रकाशांनीं कोर्टासमोर जी जबानी दिली, ती (हरिजन)मध्यें छापून त्यांनीं कॉंग्रेसच्या धोरणाचा उत्कृष्टपणें पुरस्कार केल्याबद्दल त्यांचे अभि -

नंदन केलें. या आपल्या जबानींत जयप्रकाशजींनी युद्धाबद्दलची आपली भूमिका पूर्णपणें स्पष्ट केली आहे.

जमशेदपूरयेथील युद्धविरोधी भाषणाबद्दल त्याच्यावर खटला चालून त्याना ९ महिन्याची शिक्षा झाली.त्याना अटक होण्यापूर्वी रामगड कॉंग्रेसपुढें माडण्यासाठीं त्यानी दोन ठराव धाडले होते. रामगड कॉंग्रेसमध्यें एकच ठराव व्हावा अशी गांधींजींची व वर्किंग कमिटीची इच्छा होती. त्यामुळें ते ठराव अधिवेशनात माडण्यात आले नाहींत. तरीसुद्धा ते प्रसिद्ध करून त्याना आपला पाठिंबा असल्याचें जाहीर करण्यात आलें. उद्योगधंद्याचें व जमिनीचें राष्ट्रीकरण करावें, जमिनदारी प्रथा बंद करावी. या जयप्रकाशजींच्या सूचनाना गांधीजींनीं पाठिंबा दिला होता. जयप्रकाश याचा हा ठराव कराची व फैजपूर कॉंग्रेसमध्यें राष्ट्रीकरण, किसान-कामगाराचे अधिकार याबाबत जे ठराव करण्यात आले होते, त्याच्या पुढची पायरी होती. गांधींजींनी त्याला दिलेलें अनुमोदन महत्वपूर्ण होतें, पण जयप्रकाशाचें संस्थानिकाबाबतचें धोरण मात्र गांधीजींना मान्य नव्हतें व तसें त्यानीं छापिलें.

रामगड कॉंग्रेसला अशा रीतीनें जयप्रकाशजींच्या अटकेची, गांधीजींनीं केलेल्या त्याच्या अटकेच्या निषेधाची व त्यानीं पाठविलेल्या प्रगतिशील ठरावाच्या पुरस्काराची भूमिका होती. या कॉंग्रेसमध्यें नुसती असहकाराचीच घोषणा केली असे नाहीं. असहकाराच्या भूमिकेनें या युद्धाशीं व ब्रिटिशांच्या नीतीशीं जरी आमचा काही संबंध नाहीं हें जाहीर होत असलें, तरी या नकारात्मक धोरणानें आपलें ध्येय-कॉंग्रेसची मागणी-साध्य होऊं

शकत नाहीं. या असहकारातून पुढें कायदेभंगाचा सामुदायिक लढा निर्माण होणें आवश्यक होतें. आणि जयप्रकाश व नरेंद्रदेव यानीं गांधींजींची मुलाखत घेतली, तेव्हा हीच गोष्ट स्पष्ट केली होती. आणि रामगड कॉंग्रेसपुढें गांधीजींनीं जें भाषण केलें त्यावरून त्यांचे विचार पण असेच असल्याचें दिसून आलें. गांधीजी म्हणाले,—"सामुदायिक आंदोलन करावयाचे नसते तर मी येथें आलोंच नसतों."

रामगड कॉंग्रेसमध्यें जरी उत्साहाचें व लढ्याचें वातावरण दिसलें, तरी लढा सुरू होण्याचीं कांहींच चिन्हें दिसेनात. देशांत जातीय ऐक्य नाहीं, अहिंसक वातावरण नाहीं. लढा केला तर अराजक माजेल, तेव्हा योग्य तें वातावरण निर्माण करण्यासाठीं विधायक कार्यक्रमाचा पुरस्कार गांधीजी करूं लागले. तसेंच, रामगड कॉंग्रेसनंतर लवकरच फ्रान्सचा पाडाव झाला व युद्धाला फारच गंभीर स्वरूप प्राप्त झालें. त्यावेळीं राजाजींनीं आपल्या एका भाषणांत कांहीं अटींवर युद्धसहकार्य करण्याची व 'राष्ट्रीय सरकार'ची कल्पना मांडली. मध्यवर्ति सरकारांत व प्रांतिक सरकारांत कॉंग्रेस व लीग यानीं संयुक्त मंत्रिमंडळें स्थापावित अशी त्यांची सूचना होती. जुलै महिन्यातील दिल्ली-ठरावाची ही नांदी होती. रामगड ठरावाशीं राजाजींचें हें धोरण विसंगत होतें, पण राजाजींनीं सरदार पटेलांना आपल्या बाजूला वळवून घेऊन दिल्ली येथें वर्किंग कमिटींत सशर्त सहकाराचा ठराव मंजूर करून घेतला. गांधीजींना लढ्याची कल्पना मान्य नव्हती व सहकारास ते तयार होणें शक्यच नव्हतें. तेव्हां ते निवृत्त झाले. व पुण्यास भरलेल्या अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटींत हा प्रस्ताव मंजू[illegible]

सत्ता तिच्या युद्धधोरणाबद्दल तत्वच्युत करणारा हा ठराव होता म्हणून समाजवाद्यांनी या ठरावाला विरोध केला, पण त्या अटी वर ब्रिटिश सरकारशी सहकार्य करण्यास काँग्रेस तयार झाली होती, त्या अटीच सरकारनें धुडकावून लावून तडजोडीचा दरवाजा बंद केला उलट असंख्य काँग्रेस कार्यकर्त्यांना अटक होत होती व आता लढा सुरू केला नाहीं, तर काँग्रेस नामशेष होईल व देशात गुलामी मनोवृत्ति फैलावेल, या जाणीवेनें वैयक्तिक सत्याग्रहाचा लढा सुरू करण्याचा निर्णय घेण्यात आला या ठरावाला कम्युनिस्टांनी अतिशय कडक शब्दात विरोध केला पण काहींच नाहीं त्यापेक्षा वैयक्तिक सत्याग्रह बरा पुढमागें याचेंच आंदोलनात रूपांतर होईल या आशेनें समाजवाद्यांनी या लढ्याला पाठिंबा दिला पण पूर्वीच्या लढ्यापेक्षा या लढ्याचें स्वरूप अगदी वेगळं होतें पूर्वीच्या लढ्याना गांधीजींच्या अटकेपासून सुरवात झाली होती पण गांधीजींनी या लढ्यापासून स्वतःला अलग ठेवण्याचा प्रयत्न कसोशीनें केला होता पुढाऱ्यांच्या अटकेच्या निषेधार्थ प्रचंड हरताळ, मिरवणुका, गोळीबार वगैरे गोष्टी नव्हत्या त्यामुळे जनतेवर व एकंदर वातावरणावर या लढ्यामुळें काहींच परिणाम झाला नाहीं

पुढील लढयाची तयारी करण्यासाठीं रचनात्मक कार्यकर्त्यांना बाहेर राहूनच जनतेची सेवा करण्याचा सल्ला दिला आहे, त्याच-प्रमाणें आमच्या पक्षाच्या लोकांनीं सत्याग्रह करू नये, पुढील लढयाच्या तयारीसाठीं बाहेर राहून किसान—कामगार संघटनेचें काम चालू ठेवावें, असें आपलें मत प्राजलपणें बोलून दाखविलें. वरीलप्रमाणें परिस्थितीचा आढावा घेऊन डिसेंबर १९४० मध्यें एक पत्रक काढून त्यांनीं वैयक्तिक सत्याग्रहासंबंधीं आपल्या सर्व सहकाऱ्यास योग्य तें मार्गदर्शन केलें. याच्या उलट रूसो-जर्मन करारामुळें निर्माण झालेल्या फॅसिझमविषयींच्या प्रेमोन्मादांत कम्युनिस्टांनीं कॉंग्रेस व गांधीजी यांना शिव्या देण्याचें कार्य सुरू केलें व आपल्या साम्राज्यविरोधी धोरणाच्या नावाखालीं विद्यार्थी चळवळींत आणि किसान सभेंत फूट पाडण्यास ते प्रवृत्त झाले. पण यासर्वांत डिसेंबरच्या पत्रकात जयप्रकाशजींनीं जें धोरण मांडलें तें किती योग्य व अचूक होतें, याचा पडताळा पुढें आला. सबंध युद्धकालात सुरुवातीपासून अखेरपर्यंत जय-प्रकाशजींची भूमिका अगदीं अचूक व निर्दोष होती. जयप्रकाशजींचें म्हणणें सारांशरूपानें पुढीलप्रमाणें होतें. –(१) वैयक्तिक सत्याग्रह परिणामकारक वाटत नाहीं. (२) गांधीजींच्या सध्याच्या धोर-णावरून ते स्वतः नजीकच्या भविष्यकाळात सामुदायिक लढा करतील असें वाटत नाहीं. (३) यापुढें समाजवाद्यांनीं भावी लढ्याच्या दृष्टीनें किसान-कामगारांच्या चळवळीकडे अधिक लक्ष पुरवावें. (४) युद्ध लवकरच लांबत जाईल, तसतशी परिस्थिति अधिक बिकट जाणार व परिस्थितीच्या परिणामामुळें व आपल्या वर्गीय संघटनांच्या कार्यांतूनच लढा निर्माण होऊं शकेल. (५)

वैयक्तिक सत्याग्रहास आपण विरोध करता कामा नये मात्र त्या लढ्यामागील तडजोडीची पार्श्वभूमि व त्यामुळे उत्पन्न होणारा धोका, याकडे आपण लोकांचे लक्ष वेधले पाहिजे हा दृष्टपण आणण्याचा लढा आहे व त्यामुळे तडजोडीचा प्रयत्न यातून निर्माण होईल ही कल्पना सत्याग्रहींची सुटका व क्रिप्स-वाटाघाटी यानीं खरी ठरली

यानंतर जयप्रकाश काहीं फार दिवस बाहर राहिले नाहींत युद्धपरिस्थितीबद्दल इतके अचूक विचार मांडणायाला व सामुदायिक लढयाची तयारी करण्यास प्रवृत्त करणाऱ्याला सरकार फार काळ बाहेर राहू देणें शक्यच नव्हतें, व त्याप्रमाणें मुंबईस त्यांना पकडण्यांत येऊन, स्थानबद्ध करण्यात आलें व यानंतर आगस्ट क्रांतींत हजारीबाग तुरुंगातून फरारी होईपर्यंत ते स्थानबद्धच होते

# ८. देवळीच्या तुरुंगांत

जयप्रकाश नारायण यांना त्यावेळीं मुंबईस पकडलें, त्याच सुमारास युद्धविरोधी प्रचारासाठीं हिंदुस्थानांतील इतर अनेक सोशॅलिस्ट व कम्युनिस्ट कार्यकर्त्यांना पकडण्यात आलें होतें. आणि या सर्व राजबंद्यांना एका स्वतंत्र छावणींत डांबून ठेवावें अशी कल्पना त्यावेळचे हुपार गृहमंत्री श्री मॅक्सवेल यांच्या डोक्यामधून निघाली होती व तिला अनुसरून त्यांनीं देवळी हें ठिकाण शोधून काढलें. राजपुतान्यांतील अजमेरजवळच्या ओसाड वाळवंटात देवळीची ही कुप्रसिद्ध छावणी उभारण्यात आली होती व तेथें सर्व स्थानबद्धांना आणून डांबण्यात आलें होतें. निरनिराळ्या प्रांतात स्थानबद्ध केलेल्या कार्यकर्त्यांना देवळी येथें आणून सोडण्यात येत होते. त्यातच श्री. जयप्रकाश यांची रवानगी पण तेथें करण्यात आली.

जयप्रकाशजी देवळी येथें असतांना एक आश्चर्यकारक घटना घडून आली. जयप्रकाशांच्या पत्नी प्रभावतीदेवी त्यांना भेटावयास गेल्या असतांना जयप्रकाशजींनीं त्यांच्याजवळ काहीं पत्रें चोरून देण्याचा यत्न केला, असा आरोप सरकारतर्फे करण्यात येऊन सरकारनें तीं पत्रें प्रसिद्ध केलीं. हीं पत्रें प्रसिद्ध करण्यापूर्वी आम्ही विशेष बातमी प्रसिद्ध करणार आहोंत अशी सरकारनें वर्तमानपत्रांना सूचना दिली होती. त्याचा विशेष गाजावाजा करण्याची सरकारची खटपट होती. हीं पत्रं जयप्रकाशजींच्या पत्नी भेटीस

आल्या असता त्याच्याबद्दल चोरून देण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, असा सरकारचा आरोप होता. सरकारच्या या कृत्याचा एकजात सर्व राष्ट्रीय वर्तमानपत्रांनीं निषेध केला, व 'जयप्रकाशवर खटला भरून त्याच्यावरील आरोप सिद्ध करा.' अशी एकमुखी मागणी सर्व वर्तमानपत्रांनीं केली. 'टाईम्स ऑफ इंडिया' नें आपल्या अग्रलेखांत काँग्रेसमध्यें अहिंसेवर श्रद्धा नसणारे जयप्रकाशासारखे लोक आहेत हें गांधींच्या अहिंसेशीं कसें सुसंगत आहे अशी पृच्छा केली. यानंतर खुद्द गांधीजींनीच पत्रक काढून त्यावर आपलें मत प्रतिपादन केलें. ते म्हणतात, " जयप्रकाश नारायण हे स्वतः तुरुंगांत असतांना व आपली बाजू जनतेपुढें मांडण्याची संधि त्यांना नसतांना, त्यांच्याविरुद्ध भलतेसलते आरोप करणें सरकारला शोभत नाहीं. शिवाय अत्याचारी व खुन चळवळीबद्दल एखाद्याला दोष देण्याचा अधिकार या सरकारला कसा पोंचतो ! याच सरकारच्या एखाद्या वकीलानें आफ्रिकेंतून किंवा जर्मनीमधून कांहीं कागदपत्र गुप्तपणें मिळविले असते, तर सरकारनें त्याचा गौरव नसता का केला ! मग जयप्रकाशांनीं यापेक्षा वेगळें काय केलं ? " पण जयप्रकाशजींचा पत्र जर खरीं असतील तर त्यांत जो गुप्ततेचा पुरस्कार करण्यांत आला आहे, तो योग्य नाहीं, असेंही गांधीजींनी जाता जाता स्पष्ट केलें.

जयप्रकाश यांच्या पत्रांत असें होतें तरी काय ? या पत्रांत त्यांनीं देवळी तुरुंगांतील राजबंद्यांची, त्यांच्यातील मतांतरांची माहिती दिली होती. त्याचप्रमाणें स्वतः जयप्रकाश तेथें येण्यापूर्वी तेथें असलेल्या समाजवादी राजबंद्यांमध्यें फूट पाडण्याचा व त्यांना फसविण्याचा प्रयत्न कम्युनिस्टांनीं कसा केला, राज-

बद्याच्या मागण्यांबाबत झालेल्या असत्याग्रहाचे वेळीं कम्यु-
निस्टांनीं काय कारवाया केल्या, याचें सविस्तर वर्णन त्या पत्रांत होतें. पुढें चालू परिस्थितीवर आपले विचार त्यांनीं व्यक्त केले होते १९४० डिसेंबरांत बाहेर असताना एक पत्रक काढून त्यांनी जे विचार मांडले होते, त्याचाच नव्या परिस्थितीला अनुरूप असा विस्तार त्यांनीं मांडला होता जयप्रकाशजींच्या या विचारांचें व सूचनांचें मूल्यमापन ऑगस्ट-क्रांतींत झालेल्या अनुभवाच्या प्रकाशात करणे फार सोपें आहे व महत्वाचें आहे. त्यांच्या विचाराचा सारांशरूपानें जरी परामर्श घेतला, तरी भावी परि-स्थितीचें किती अचूक निदान त्यांनीं केलें होतें हें स्पष्ट होईल

(१) यावेळीं रशिया युद्धात पडलेला होता म्हणून कम्यु-निष्ट लोक 'लोकयुद्धा'च्या आरोळ्या मारूं लागले होते व साम्राज्यविरोधाच्या घोषणा पण करीत होते; (हॅरि पॉलिटकडून पुढें थप्पड मिळाल्यानतर त्यांनीं सहकार्याचें धोरण स्वीकारलें ) पण रशिया युद्धात पडल्यानें युद्धाचें स्वरूप पालटलें नाहीं, ही गोष्ट जयप्रकाशनीं स्पष्ट केली होती. युद्धसाम्राज्यवादीच अस-ल्यानें आपला राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा व लढ्याची पूर्वतयारी म्हणून निरंतर वर्गीय चळवळी पण चालू ठेवल्या पाहिजेत

(२) गांधीजींनीं चालविलेला वैयक्तिक सत्याग्रह परिणाम-शून्य आहे, त्यामुळें तजस्वी व परिणामकारक लढा कांहीं भागात तरी सुरू करणें अवश्य आहे.

(३) भारी लढा केव्हा होईल ते आज सांगता येत नाहीं. वर्गीय संघटनांमुळें लढ्याला अनुकूल परिस्थिति प्राप्त होईल

मध्यंतरीच्या काळात सरकारी दडपशाही चालू आहे, तेव्हा या दडपशाहीपासून आपला बचाव करून, युद्धविरोधी प्रचार व इतर संघटना करण्यासाठी गुप्त संघटना उभारणें जरूर आहे. या गुप्त संघटनेमुळें भावी लढ्याला मदत होईलच, पण तरुण वर्गालाही कम्युनिस्टांकडून आपणाकडे आकर्षित करून घेण्याची शक्यता निर्माण होईल.

( ४ ) कम्युनिस्टांनीं कम्युनिस्टेतर पक्षांना, गटांना व व्यक्तींना समाजवादी पक्षाविरुद्ध वापरलें आहे. सुभाष बोसवर ते भयंकर टीका करतात, तरी फारवर्ड ब्लॉकच्या लोकांचें साहाय्य घेतात. आपण सुभाषबाबूंना गट व इतर दहशतवादी गट (हिंदुस्थान रेड आर्मी वगैरे) यांना आपल्या बाजूला वळवून घेतलें पाहिजे मॉस्कोच्या कम्युनिस्ट इंटरनॅशनलविरुद्ध क्रांतिकारकांची एकजूट उभारली पाहिजे.

( ५ ) पक्षाच्या कार्याला पुरेसा पैसा मिळत नाहीं. बिहारच्या सारख्या कार्यक्षम पक्षाला पुरेसा पैसा मिळू नये हें दुर्दैव होय. यासाठीं गुप्त संघटनेच्या द्वारा आजपर्यंत क्रांतिकारकांनीं ज्या इतर साधनांचा अवलंब केला, त्या साधनांनीं पैसा मिळविला पाहिजे. पैशासाठीं कार्य अडून राहातां कामा नये.

जयप्रकाशनीं आपल्या पत्रांत इतरही अनेक सूचना केल्या होत्या. त्यांचें हें पत्र म्हणजे रूसो जर्मन युद्ध सुरू झाल्यावर व वैयक्तिक सत्याग्रहाची परिणामकारता शून्य ठरल्यानंतर उत्पन्न झालेल्या परिस्थितींत समाजवादी कार्यकर्त्यांना उत्कृष्ट मार्गदर्शन होतें. म्हणून त्या पत्रांतील महत्त्वाच्या गोष्टींचा वर उल्लेख केला आहे. वैयक्तिक सत्याग्रहाला "फार्स" असें संबोधिल्याबद्दल

कित्येकांच्या मनात गैरसमज निर्माण झालेला होता. पण, खुद्द गांधीजींनाच वैयक्तिक सत्याग्रहाच्या वैफल्याची जाणीव झाली होती आणि पुढे तर त्यांनी स्वतःच "चले जाव" ची घोषणा केली. जयप्रकाश व समाजवादी ज्या लढ्याची मागणी करीत होते, त्या लढ्याचीच काय, पण प्रत्यक्ष "उघड बंडा" चीच हाक गांधीजींनीं दिली. ऑगस्टच्या क्रांतियुद्धात तयारीच्या अभावी, गुप्तसंघटनेच्या अभावी जें अपयश आलें व कम्युनिस्टांनीं जें देशद्रोही धोरण स्वीकारलें त्यावरून याविषयीं श्री जयप्रकाश यांनीं जे विचार व्यक्त केले होते, ते किती अचूक व यथार्थ होते त्याची कल्पना येईल. जयप्रकाश यांचें पत्र जेव्हा प्रसिद्ध करण्यात आलें तेव्हा कित्येकांनीं त्याची चेष्टा करण्याचा प्रयत्न केला. हिंदी जनतेच्या क्रांतिकारक शक्तीवर या लोकांचा विश्वास नसल्यामुळें जयप्रकाश यांचे विचार स्वप्नवत आहेत असें या लोकांना वाटत असावें. पण, ऑगस्ट महिन्यात ज्यावेळीं हिंदी जनतेनें अभूतपूर्व अशी उठावणी केली तेव्हा या लोकांना आपली चूक कळून आली व जयप्रकाश हे काहीं स्वप्नदर्शी क्रांतिकारक नसून वस्तुनिष्ठ पण ध्येयनिष्ठ आहेत, अशी त्यांची खात्री पटली.

असो; जयप्रकाशजींची पत्रें प्रसिद्ध करण्यात सरकारचा हेतू दुष्टपणाचा होता यात शंका नाहीं. जयप्रकाश व गांधीजी यांचे किती जिव्हाळ्याचे संबंध आहेत हें गांधीजींनी १५ सप्टेंबर १९४० रोजीं भरलेल्या अ. भा. कॉं कमिटीच्या भाषणात काढलेल्या उद्गारावरून सरकारला स्पष्ट झालें होतें. त्यांच्यात अविश्वास उत्पन्न व्हावा, व जयप्रकाशप्रभृतींची कॉंग्रेसमधून हकालपट्टी व्हावी व कॉंग्रेसमध्यें दुफळी माजावी असा सरकारचा नीच

हेतु होता. त्याचप्रमाणें कॉंग्रेस सत्तेची परदेशी बदनामी व्हावी, हाही ब्रिटीशाचा हेतु होता. जयप्रकाशजींच्या पत्राचा स्वतःचा मजकूर घालून सरकारनें विपर्यस्त खुलासा केला होता. अर्थाचा अनर्थ करून अमेरिकन जनतेच्या डोळ्यात धूळफेक करण्याचा हा डाव होता. सरकारची कॉंग्रेसशी युद्ध करण्याची ही अभिनव नीति होती. प्रथम जयप्रकाशांचें पत्र, नंतर अलाहाबाद येथें १९४२ एप्रिलमध्यें झालेल्या वर्किंग कमिटीच्या बैठकीचीं अनधिकृत टिपणें व गांधीजींच्या उपोषणाच्या वेळीं "ऑगस्ट क्रांतीची जबाबदारी" या नांवाचें चोपडें प्रसिद्ध करून सरकारनें अमेरिकेंत व इतर कॉंग्रेसला बदनाम करण्याचा प्रयत्न केला. पण सर्वांत आनंदाची गोष्ट ही की, या तिन्ही प्रसंगीं कांहीं ॲंग्लो-इंडियन पत्रें सोडून दिली तर, हिंदुस्तानांतील "बॉम्बे क्रॉनिकल" 'फ्री प्रेस', 'हिंदू', 'हिंदुस्तान टाइम्स', 'नॅशनल हेरल्ड', 'अमृत बझार पत्रिका' वगैरे इंग्रजी आणि देशी भाषांतील सर्व राष्ट्रीय वर्तमानपत्रांनीं कॉंग्रेसची बाजू घेऊन सरकारी कृत्याचा तीव्र निषेध केला.

जयप्रकाश देवळीच्या तुरुंगात असताना आणखी एक महत्त्वपूर्ण घटना घडून आली. ती म्हणजे देवळी तुरुंगातील राजबंद्यानीं आपले हक्क मिळवून घेण्याकरतां सुरू केलेला महान लढा. देवळीची हवा फारच खराब होती; अनेक राजबंद्यांना ती मानवत नव्हती. तसेंच, राजबंद्यामध्यें जे वर्गीकरण करण्यात आलें होतें तें जयप्रकाशप्रभृतींना मान्य नव्हतें. तसेंच, कितीतरी राजबंदी हे आपल्या कुटुंबातले एकुलते एक कर्ते पुरुष होते, व त्यांच्या अटकेमुळें त्यांच्या कुटुंबियांचे हाल चालले होते. तेव्हां आपले व

आपल्या कुटुंबियांचे हाल नाहींसे व्हावेत आणि आपल्या इतर रास्त मागण्या मिळाव्यात म्हणून श्री. जयप्रकाशजींच्या नेतृत्वाखालीं देवळींतील स्थानबद्धांनी सरकारकडे पुढील मागण्या मांडल्या.

(१) सर्व स्थानबद्धांना आपापल्या प्रांतात परत पाठवावे.

(२) स्थानबद्धांमध्ये पाडलेले वर्गीकरण रद्द करून सर्वांना समान दर्जानें वागवावें.

(३) स्थानबद्धांच्या कुटुंबियांना भत्ता देण्यात यावा.

(४) याखेरीज तुरुंगात मिळणाऱ्या अन्न, वैद्यकीय मदत वगैरे बाबतींत इतर मागण्या मांडण्यात आल्या होत्या.

या गाऱ्हाण्याचा विचार करण्यासाठीं सरकारला १३ दिवसांची मुदत देण्यात आली होती. पण १३ दिवसांत कांहींच उत्तर सरकारतर्फे न आल्यामुळें, किंवा गाऱ्हाण्याची योग्य ती दाद न लागल्यामुळें ता. २३ ऑक्टोबर १९४१ रोजीं देवळीच्या छावणींतील २०८ राजबंद्यांनीं अन्नसत्याग्रह सुरू केला. या लढ्याचें नेतृत्व श्री. जयप्रकाश नारायण यांचेकडेच होतें.

हा अन्नसत्याग्रह चालू असतानाही तुरुंगात व तुरुंगाबाहेरही या गोष्टीचा आपल्या पक्षबाजीकडे उपयोग करता यावा म्हणून कम्युनिस्टांनीं अनेक दुष्ट कारवाया केल्या. या अन्नत्यागाच्या वेळीं सर्व देशभर भयंकर खळबळ उडाली, तेव्हां या प्रश्नावर तरुणांची सहानुभूति मिळवावी म्हणून विद्यार्थ्यांमध्यें सार्वजनिक संपाची घोषणा देण्याचा विचार कम्युनिस्टांनीं केला होता. पण शाळा कॉलेजें बंद आहेत असें पाहून त्यानीं माघार घेतली.

असो. अन्नत्यागाची वातमी ऐकताच सर्व देशभर फार मोठी

खळबळ उडाली. मध्यवर्ति असेंब्लीमध्यें या प्रश्नावर लोकप्रतिनिधींनी अनेक प्रश्न विचारले. तेव्हा राजबंद्यांनी अन्नत्याग मागें घेतल्याखेरीज आम्ही कसलाच विचार करावयास तयार नाहीं, असें गृहमंत्र्यांनीं ठासून सांगितलें. पण, राजबंद्यांनी आपणास तेरा दिवसाची पूर्वसूचना दिली होती ही गोष्ट सांगण्याचें मात्र ते सोइस्करपणें विसरून गेले. तेव्हा राजबंद्यांनी पण माघार घेण्यास स्पष्ट नकार दिला. आम्ही सरकारला तेरा दिवसाची मुदत दिली होती, तेवढ्या अवधींत सरकारनें आमची काहींच दाद घेतली नाहीं, तेव्हा आता आमच्या मागण्या मान्य केल्याखेरीज आम्ही अन्नसत्याग्रह मागें घेणार नाहीं असें त्यांनीं स्पष्टपणें सांगितलें.

राजबंद्याच्या मागण्याचा पुरस्कार करण्यासाठीं व त्यांच्या लढ्याला सहानुभूति दाखवण्यासाठीं यावेळीं सर्व देशभर फार मोठी चळवळ सुरू झाली. 'राजबंद्याच्या मागण्या मान्य करा", "देवळी तुरुंग बंद करा" अशा घोषणानीं सर्व शहरें दुमदुमून गेली. मुंबई, पुणें, अहमदाबाद, लखनौ वगैरे शहरातल्या विद्यार्थ्यांनीं व नागरिकांनीं एक "देवळी दिन" साजरा केला. सर्व देशभर हजारों लहान मोठ्या सभा भरून राजबंद्याच्या मागण्याचा पाठपुरावा करण्यात आला. सर्व देशभरच्या तरुणानीं विद्यार्थ्यांनीं, कामगारानीं, किसानानीं " देवळी तुरुंग बंद करा " " जयप्रकाश नारायण की जय " या आरोळ्यानी वातावरण दुमदुमून सोडलें आणि देवळीच्या राजबद्याना व त्यांच्या कुटुंबियाना असलेली आपली अपूर्व सहानुभूति व्यक्त केली.

दिवसेंदिवस वातावरण चिघळत चाललें. कारण माघार घेण्यास कोणीच तयार होईना. राजबंद्याची प्रकृती ढासळत चालली.

कितीतरी लोक गंभीर झाले. असेंब्लीमध्ये पुन्हा प्रश्नोत्तरें झालीं. श्री. ना. म. जोशीप्रभृति पुढाऱ्यांनीं स्थानबद्धांची भेट घेऊन त्यांची समजूत काढण्याचा प्रयत्न केला. ३३ दिवसपर्यंत हा प्रचंड संग्राम चालू होता. देवळी तुरुंगातील राजबंद्यांच्या हक्कासाठीं झगडणाऱ्याचा नेता म्हणून जयप्रकाशजींचें नाव सर्व देशभर प्रसिद्ध झालें, पण सरकारची राक्षसीवृत्ति लवकर हटण्याची लक्षणें दिसेनात. ६० वर्षांचे वृद्ध राजबंदी किंवा रोगानें पछाडलेले राजबंदी सर्व यात सामील झाले होते. अखेर तडजोड होऊन राजबंद्यांच्या मागण्या सरकारनें मान्य केल्या व त्याना आपापल्या प्रांतात पाठवून देण्यात आलें. श्री. जयप्रकाश नारायण यांची रवानगी हजारीबाग तुरुंगात करण्यात आली.

देवळीच्या अन्नत्यागामुळें जयप्रकाश नारायण हे तरुण व विद्यार्थी वर्गात फारच लोकप्रिय झाले, आणि कॉंग्रेस समाजवादी पक्षाची प्रतिष्ठा फारच मोठ्या प्रमाणात वाढली, पण या रुक्याचा त्यांच्या प्रकृतीवर फारच प्रतिकूल परिणाम झाला.

# ९. हजारीबाग तुरुंगांत

देवळीच्या छावणींतून जयप्रकाशजींची हजारीबाग तुरुंगात बदली करण्यात आली. तेथून त्यांना सरकारनें सोडलेंच नाहीं. ४ डिसेंबर १९४१ रोजीं पंडित नेहरूंसह सर्व काँग्रेस राजबंद्यांना एकदम सोडून देण्यात आलें व वैयक्तिक सत्याग्रहाच्या मागें तडजोडीचें राजकारण आहे, हें जयप्रकाशजींचें भाकीत लवकरच खरें ठरलें. पण इतर सर्वांना सोडण्यात आलें. नरेंद्रदेव, डॉ. लोहिया, अच्युत पटवर्धनप्रभृति समाजवादी लोकांनासुद्धा सोडण्यात आलें; पण जयप्रकाशजींना तसेंच डांबून ठेवण्यात आलें. त्यांच्या देशप्रेमाला व क्रांतिवादाला सरकारनें दिलेलें तें एकप्रकारचें शिफारसपत्रच होतें.

सर्व पुढारी सुटल्यानंतर स्वतःला समाजवादी म्हणविणारे ब्रिटिश मंत्रि सर स्टॅफोर्ड क्रिप्स आपली कुप्रसिद्ध योजना घेऊन आले व काँग्रेस काहीं थोडी फार सत्ता घेऊन ब्रिटिश साम्राज्यशाहीशीं समझोता करते काय असा संशय उत्पन्न झाला. हजारीबाग तुरुंगात बसून जयप्रकाश सर्व घडामोडींकडे मोठ्या अधीरतेनें पहात होते. शेवटीं काँग्रेस–क्रिप्स वाटाघाटी फिसकटल्या.

नंतर गांधीजींनी आपली 'चले जाव'ची घोषणा केली. इतकीं वर्षें आपण केलेल्या कामगिरीचें सार्थक होणार, आपण घेतलेल्या धोरणाचा विजय होणार, या भावनेनें जयप्रकाश फार आनंदित झाले. पण, या संग्रामांत आपणांला भाग घेतां येणार

नाहीं, या भावनेनें त्याचें मन फार खट्टू झालें. याच सुमारास त्यानीं हजारीबाग तुरुंगातून आपलें सहकारी श्री. अच्युतराव पटवर्धन याना एक पत्र लिहिलें व आपणास या संग्रामात भाग घेता येणार नाहीं म्हणून, वाटत असलेलें दुःख व असहायता व्यक्त केली.

पुराणकालातील लोक आकाशवाणीचे शब्द ऐकण्यासाठीं जशी अधीरता दाखवीत, त्याच अधीरतेनें श्री. जयप्रकाश नारायण हजारीबाग तुरुंगात बसले होते. आठ ऑगस्टचा तो क्रांतीचा शब्द ऐकताच ते अधीर झाले. त्यावेळीं कानावर पडलेला क्रांतिशब्द त्याच्या कितीतरी आधीं उमटावा म्हणून त्यानीं किती प्रयत्न केले होते ! आणि या उमटलेल्या शब्दाचा पडसाद प्रत्येक व्यक्तीच्या अंतःकरणांत उमटावा म्हणून त्यानीं कितीतरी योजना आखल्या होत्या. सर्व पुढारी पकडले जात असताना या क्रांतिध्वनीला दूरध्वनिक्षेपक मिळणार नाहींत आणि हा ध्वनी शेवटीं अनंत आकाशांत विरून जाईल, या भीतीनें ते अगदीं अस्वस्थ झाले. शेवटी यावेळीं आपण बाहेर गेलेंच पाहिजे व अनंत अवकाशात विरूं पहाणाऱ्या या शब्दाला आपल्या देहाचीसुद्धा पर्वा न करतां पकडून पुढील इतिहासकाराना ज्याची नोंद करावी लागेल, एवढा मोठा त्याचा प्रतिवाद हिंदी जनमनांतून काढण्याचा प्रयत्न केला पाहिजे, असें ठरवून एके दिवशीं मोठ्या हिकमतीनें हजारीबाग तुरुंगाच्या भिंती उडून ते बाहेर पडले.

जयप्रकाश बाहेर कसे पडले याची निश्चित माहिती आजच सांगतां येणार नाही. पण यासंबंधी जी ऐकीव बातमी आहे, तिच्यात बरेंच तथ्य असण्याचा संभव आहे. ज्या दिवशीं

जयप्रकाश बाहेर पडले तो दिवाळीचा दिवस होता. आणि त्या दिवशीं सर्व राजबंद्यांना बाहेरच ठेवण्यात आलें होतें. सर्व लोक व अधिकारी बहुधा दिवाळीचा आनंद लुटण्यात मग्न झाले आहेत असें पाहून रामानंद मिश्रा, योगेंद्र शुक्ला वगैरे आपल्या निवडक सहकाऱ्यासह तुरुंगातून निसटण्याचा एक धाडसी बेत जयप्रकाशनीं रचला. बाहेर पडण्याची सर्व व्यवस्था करून ते आपल्या सहकाऱ्यासह तुरुंगाच्या भिंतीजवळ आले. एकाला एक धोतरें बांधून त्यांनीं एक मजबूत दोर तयार केला आणि त्याच्या साहाय्यानें ते जेलच्या भिंती चढून गेले. पण, तेवढ्या गडबडीत पैसे वगैरे इतर सामान घेतलेली त्यांची पिशवी खाली पडली आणि हे सहा वीर जेलच्या दुसऱ्या बाजूस आले. पण, त्याच्या सुदैवानें रामानंद मिश्रा यांच्या बंडीत त्यांच्या पत्नीनें एक १०० रु. ची नोट शिवून ठेवली होती ह्याची त्यांना आठवण झाली. रातोरात पायपीट करून एका ठिकाणीं जाऊन त्यांनी १०० रु. ची मोड मिळवली, आणि ते सहा वीर सहा निरनिराळ्या दिशांना पसार झाले; आणि जंगलाचा व अडीअडचणींचा रस्ता तुडवून बाहेरच्या स्वातंत्र्य-संग्रामात ते सामील झाले.

## १०. ऑगस्टचा अज्ञातवास

९ नोव्हेंबर १९४२ रोजीं जयप्रकाशजी हजारीबाग जेलच्या भिंती ओलांडून बाहेर पडले. तेव्हां देशांतील परिस्थिति मोठी नाजूक होती. बरोबर तीन महिन्यापूर्वी मुंबईस अ. भा. कॉंग्रेस समितीनें सुप्रसिद्ध " चले जाव " ठराव पास केला होता. आणि ता. ९ च्या पहाटेस महात्मा गांधी, कॉंग्रेस वर्किंग कमिटीचे सभासद व देशांतील हजारो कॉंग्रेस कार्यकर्ते अचानक पकडले गेले होते. आणि सर्व हिंदुस्थानभर भयंकर प्रक्षोभ माजून इंग्रजी राज्य नामशेष करण्यासाठी जनतेनें फार मोठा उठाव केला होता.

ज्या दिवशीं पुढारी पकडले गेले, त्या दिवशीं मुंबई शहरांत सार्वजनिक हरताळ पडला. जवळ जवळ दोन लाखाचे वर कामगार आपापल्या गिरण्यामधून बाहेर पडले आणि त्यांनीं स्वातंत्र्याची प्रचंड घोषणा केली. दशहजारांनीं विद्यार्थी शाळा-कॉलेजांतून बाहेर पडले आणि " चले जाव " च्या घोषणांनीं सर्व शहर दुमदुमून गेलें. सर्वत्र मोठमोठ्या मिरवणुकी निघाल्या. लोकांनीं ट्रामची व रेल्वेची रहदारी बंद पाडली आणि दादर स्टेशन कित्येक तासपर्यंत ताब्यात घेतलें. दोन दिवसपर्यंत मुंबई शहरांतले इंग्रजांचें राज्य नाममात्रच होतें मग मात्र गोरे सैनिक व पोलिस यांच्या बंदुकींच्या जोरावर सरकारनें भयंकर अत्याचारास सुरवात केली. पण, गिरण्या आणि शाळा-कॉलेजें ही मात्र अनुक्रमें दोन आठवडे व तीन महिनें बंदच राहिलीं !

मुंबईप्रमाणेंच सर्व हिंदुस्थानातील मोठमोठ्या शहरातले सर्व व्यवहार बंद पडले. गिरण्या, दुकानें, विद्यालयें, वहातुकीची साधनें बंद पडून जनतेच्या हजारोंच्या मिरवणुकी व त्यावर पोलिसांचे अमानुष गोळीबार हेंच दृश्य सर्व शहरात दिसू लागलें. या काळात कितीतरी अज्ञात तरुण मारले गेले असतील स्वातंत्र्याकांक्षेनें पेटलेले तरुण शहराशहरातून टेलिफोनच्या तारा तोडूं लागले. पोस्टाच्या पेट्या नामशेष करणें, पोलिस चौक्यावर हल्ले करणें आणि ब्रिटिश—सत्तेचीं केंद्रस्थानें नाहींशीं करणें, असें क्रांतिकारक कार्यक्रम सर्व शहरीं जनतेनें स्वयंस्फूर्तीनें स्वीकारलें. नागपूर, मोंघीर, अहमदाबाद वगैरे शहरातील ब्रिटिशाची शासनयंत्रें प र कोलमडून पडलीं होतीं. नागपूर शहरात तर चार दिवसपर्यंत गोऱ्या सैनिकाची रस्त्यावर पडण्याची छाती नव्हती. मोंघीर शहराशीं चौदा दिवसपर्यंत ब्रिटिशाचें दळणवळण संपूर्णपणें नष्ट झालें होतें. शहराशहरातून ब्रिटिश अधिकाऱ्यानीं कर्फ्यू ऑर्डर्स् पुकारल्या होत्या पण, त्या कोणी जुमानीत नव्हते आणि त्याची अंमलबजावणी करण्याची ब्रिटिश हस्तकाची छाती नव्हती.

सर्व औद्योगिक शहरातील कामगार संपावर गेले होते मुंबई नागपूर, अहमदाबाद, सोलापूर, कोइमतूर, जमशेदपूर, वगैरे शहराचे रस्ते संपावर गेलेल्या कामगारानीं भरून गेले होते. आणि पहिले आठ दिवस त्या सर्व शहरातील नेहमीचे व्यवहार बंद होते अहमदाबादचे कामगार तर स्वातंत्र्यासाठीं गिरण्या बंद पाडून गावोगांव निघून गेले, ते तीन महिनेपर्यंत परतच आले नाहीत. जमशेदपुरच्या कामगारानीं चाळीस दिवसांपर्यंत यशस्वी रीतीनें संप चालविला होता.

विद्यार्थी तर या स्वातंत्र्य-लढ्यात आघाडीवर होते. सर्व विश्वविद्यालयें, कॉलेजें व शाळा संपूर्णपणें बंद पडली होतीं. मोठमोठ्या शहरात हजारों विद्यार्थ्यांनीं मिरवणुकी काढल्या, आणि हजारों विद्यार्थी क्रांतीचा संदेश शेतकरी वर्गांत पोंचवण्यासाठीं खेडोंपाडीं पसरले होते. सहा महिनेपर्यंत सर्व शिक्षणसंस्था ओस पडल्या होत्या, आणि स्वातंत्र्यलढ्यात विद्यार्थी-वर्ग मग्न होता.

शहरात पेटलेली ही क्रांतीची लाट हा हा म्हणता खेडोंपाडीं पोंचली. " गांधी महाराज की जय ! " आणि " चले जाव ! " या घोषणा लाखों खेड्यातून निघू लागल्या. खेड्याखेड्याचे शेतकरी हजारोंच्या समूहानें एकत्र जमूं लागले आणि तालुक्याच्या कचेऱ्यावर मोर्चे नेऊन राष्ट्रध्वज उभारण्याचा कार्यक्रम सुरूं झाला. ब्रिटिश-सत्तेची ही केंद्रें आपण हस्तगत केली पाहिजेत आणि त्याकरितां सामुदायिक उठाव केला पाहिजे, ही क्रांतिकारक सत्तासंपादनाची कल्पना प्रांतप्रांतांतून, जिल्हां-जिल्ह्यातून, तालुक्यातालुक्यातून वाऱ्याप्रमाणें पसरू लागली. पार्लीया, भागलपूर, मुझफरपूर, मिदनापूर, वगैरे जिल्ह्यात दहा दहा हजारांनी शेतकऱ्यांचे मोर्चे आणले. बिहार प्रांतात शेकडों तालुक्याच्या कचेऱ्या कबीज करून जाळून खाक केल्या. आणि रेल्वे स्टेशनावरून हल्ले करून त्यांची धूळधाणी केली. बालीया जिल्ह्यांत पन्नास हजारांचेवर शेतकऱ्यांनी मोर्चा नेऊन कलेक्टरला शरण आणलें. तुरुंगाचे दरवाजे खुले करून शेकडों राजबंद्यांना मुक्त केलें. प्रचंड जनशक्तीच्या विराट शक्तीचें दर्शन सर्व हिंदुस्थानभर होत होत. भागलपूर, मिदनापूर वगैरे किती तरी जिल्ह्यांत लोकांनीं स्वतःची कोर्टे व सरकारें स्थापन

मुंबईप्रमाणेंच सर्व हिंदुस्थानातील मोठमोठ्या शहरातले सर्व व्यवहार बंद पडले. गिरण्या, दुकानें, विद्यालयें, वहातुकीचीं साधनें बंद पडून जनतेच्या हजारोंच्या मिरवणुकी व त्यावर पोलिसांचे अमानुष गोळीबार हेंच हृदय सर्व शहरात दिसूं लागलें. या काळांत कितीतरी अज्ञात तरुण मारले गेले असतील. स्वातंत्र्याकांक्षेनें पेटलेले तरुण शहराशहरातून टेलिफोनच्या तारा तोडूं लागले. पोस्टाच्या पेट्या नामशेष करणें, पोलिस चौक्यां-वर हल्ले करणें आणि ब्रिटिश-सत्तेचीं केंद्रस्थानें नाहींशीं करणें, असे क्रांतिकारक कार्यक्रम सर्व शहरीं जनतेनें स्वयंस्फूर्तीनें स्वीकारले. नागपूर, मोंघीर, अहमदाबाद वगैरे शहरातील ब्रिटि-शांची शासनयंत्रे पार कोलमडून पडलीं होतीं. नागपूर शहरांत तर चार दिवसपर्यंत गोऱ्या सैनिकांनी रस्त्यावर पडण्याची छाती नव्हती. मोंघीर शहरांशीं चौदा दिवसपर्यंत ब्रिटिशांचे दळणवळण संपूर्णपणें नष्ट झालें होतें. शहराशहरातून ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं कर्फ्यू ऑर्डर्स् पुकारल्या होत्या पण, त्या कोणी जुमानीत नव्हते आणि त्याची अंमलबजावणी करण्याची ब्रिटिश हस्तकाची छाती नव्हती.

सर्व औद्योगिक शहरांतील कामगार संपावर गेले होते मुंबई नागपूर, अहमदाबाद, सोलापूर, कोइमतूर, जमशेदपूर, वगैरे शहराचे रस्ते संपावर गेलेल्या कामगारानीं भरून गेले होते. आणि पहिले आठ दिवस त्या सर्व शहरातील नेहमीचे व्यवहार बंद होते. अहमदाबाचे कामगार तर स्वातंत्र्यासाठीं गिरण्या बंद पाडून गावोगांव निघून गेले, ते तीन महिनेपर्यंत परतच आले नाहीत. जमशेदपुरच्या कामगारानीं चाळीस दिवसांपर्यंत यशस्वी रीतीनें संप चालविला होता.

विद्यार्थी तर या स्वातंत्र्य-लढ्यांत आघाडीवर होते. सर्व विश्वविद्यालयें, कॉलेजें व शाळा संपूर्णपणें बंद पडली होतीं. मोठमोठ्या शहरांत हजारों विद्यार्थ्यांनीं मिरवणुकी काढल्या, आणि हजारों विद्यार्थी क्रांतीचा संदेश शेतकरी वर्गांत पोंचवण्यासाठीं खेडोंपाडीं पसरले होते. सहा महिनेपर्यंत सर्व शिक्षणसंस्था ओस पडल्या होत्या, आणि स्वातंत्र्यलढ्यांत विद्यार्थी-वर्ग मग्न होता.

शहरांत पेटलेली ही क्रांतीची लाट हां हां म्हणतां खेडोंपाडीं पोंचली. "गांधी महाराज की जय!" आणि "चले जाव!" या घोषणा लाखों खेड्यांतून निघू लागल्या. खेड्याखेड्यांचे शेतकरी हजारोंच्या समूहानें एकत्र जमूं लागले आणि तालुक्यांच्या कचेऱ्यावर मोर्चे नेऊन राष्ट्रध्वज उभारण्याचा कार्यक्रम सुरूं झाला. ब्रिटिश-सत्तेचीं हीं केंद्रें आपण हस्तगत केलीं पाहिजेत आणि त्याकरितां सामुदायिक उठाव केला पाहिजे, ही क्रांतिकारक सत्ताधिपादनाची कल्पना प्रांतोप्रांतांतून, जिल्हा-जिल्ह्यातून, तालुक्यातालुक्यांतून वाऱ्याप्रमाणें पसरूं लागली. बालीया, भागलपूर, मुझफरपूर, मिदनापूर, वगैरे जिल्ह्यांत दहा दहा हजारांनीं शेतकऱ्यांचे मोर्चे आणले. बिहार प्रांतांत शेकडों तालुक्यांच्या कचेऱ्या कबीज करून जाळून खाक केल्या. आणि रेल्वे स्टेशनांवरून हल्ले करून त्याची राखरांगोळी केली. बालीया जिल्ह्यांत पन्नास हजारांचेवर शेतकऱ्यांनीं मोर्चा नेऊन कलेक्टरला शरण आणलें. तुरुंगाचे दरवाजे खुले करून शेंकडों राजबंद्यांना मुक्त केलें. प्रचंड जनशक्तीच्या विराट शक्तीचें दर्शन सर्व हिंदुस्थानभर होत होतें. भागलपूर, मिदनापूर वगैरे कित्येक जिल्ह्यात लोकांनीं स्वतःचीं कोर्टें व सरकारें स्थापन

केली होती आणि ब्रिटिश सरकारची सत्ता संपूर्णपणें नामशेष झाली होती.

आपल्याकडे महाराष्ट्रांत व कर्नाटकांत या उठावाचें स्वरूप तितकेंच व्यापक व उग्र होतें. खानदेशांत अमळनेरच्या लोकांनी हजारोंचा मोर्चा नेऊन स्टेशन व कचेरी जाळून टाकली. महाडला ५०० शेतकऱ्यांनी सशस्त्र मोर्चा कचेरीवर नेला आणि पोलिसांची व स्वातंत्र्य–सैनिकांची चकमक उडून दहाबारा लोक मारले गेले. सातारा, तासगाव, वडूज, इस्लामपुर या गांवीं हजारो शेतकऱ्यांनी मोर्चे नेऊन तालुक्याच्या कचेऱ्यांवर झेंडे लावले. करडापासून बेळगांवपर्यंतची सर्व रेल्वे स्टेशनें जळून टाकली. कर्नाटकांत बेळगांव व धारवाड जिल्ह्यांत असेच अनेक मोर्चे निघाले. इतकेंच नव्हे तर, तालुक्याच्या केंद्राप्रमाणें खेड्या-खेड्यांनी ब्रिटिश राज्य नाहीसें करण्याचा सामुदायिक कार्यक्रम फार मोठ्या प्रमाणांत झाला. सातारा, कोल्हापूर बेळगांव वगैरे भागांत शेंकडो खेड्यांतील चावड्यांवर हल्ले करून त्या लोकांनी जाळून टाकल्या. पोलीसपाटलांची दप्तरें काबीज करून तीं नष्ट केली.

सरकारनें हजारावधि लोक पकडून तुरुंगांत टाकले, पण क्रांतीची लाट ओसरेना. हजारो लोकांवर पकड-वॉरंटें काढली होतीं. पण क्रांतीचा उघडउघड प्रचार करीत ते लोक उघडपणें गावो-पाडीं फिरत होते. क्रांतीच्या या पहिल्या मोहिमेंत जिकडे जनतेनें त्यांची मिळवणी थांब पडली नाही. आपल्या कार्यांत सरकाराचा व पोलिसांचा अडथळा येणार, ही गोष्ट पण लोक जाणून होते. तेव्हां हा अडथळा येऊं नये, पोलिसांच्या हालचाली बंद पाडाव्यात, म्हणून लोकांनी बहादुरीच्या दळणवळणाच्या साधनांचा

नाश करण्यास सुरवात केली. हजारो मैल टेलिफोनच्या तारा तोडून टाकल्या. तारायंत्रे बंद पाडली कितीतरी ठिकाणी रेल्वेचे रूळ उखडून टाकले. मद्रासजवळ तर ८० मैल रेल्वेलाईन उखडून टाकली. बिहार व संयुक्तप्रातामध्ये रेल्वेची वहातुक एक आठवडाभर बंदच पडली. मोटारची वहातुक बंद करण्यासाठी लोकांनी मोठमोठे वृक्ष तोडून रस्त्यावर आडवे टाकले सुरत, अहमदाबाद, वर्धा, नागपूर, मुंबई बी. एन् आर. रेल्वेवर ठिकठिकाणी रूळ उखडून, तारा तोडून, स्टशनें जाळून, सरकारी वहातुक बंद करण्याचा प्रयत्न केला. पुणें ते बंगलोर ही एम् एस् एम्. रेल्वेची लाईन रात्रौ प्रवास करण्यास धजेना. रेल्वे रस्ते, मोटार रस्ते, स्टेशनें, विमानतळ वगैरे सर्व वहातुकीच्या केंद्रावर व मर्मांवर हल्ले करून ब्रिटिश सत्ता नाहींशी करण्यासाठीं लोक किती अधीर झाले होते या भावनेचा विराट आविष्कार झाला.

दीडशें वर्षे आपणाला गुलामगिरींत जखडणाऱ्या व आपल्या रक्ताचें शोषण करणाऱ्या ब्रिटिश सत्तेचा संपूर्ण नायनाट केला पाहिजे, याच जाणीवेनें लोक चवताळून उठले आणि जन-शक्तीच्या प्रचंड हल्ल्यापुढें कित्येक प्रांतातील ब्रिटिश सत्ता संपूर्ण नामशेष झाली साम्राज्यशाहीबद्दल वाढणारा तिरस्कार व ब्रिटिश राजवटीबद्दल असणारा तीव्र द्वेष या भावनांनी चिडलेल्या हिंदी किसान-कामगारांचा तो प्रचंड उठाव होता. आणि आपल्या सामुदायिक हल्ल्यानें आपण सरकारी सत्ता कोलमडून पाडूं शकतों हें त्यानीं कृतीनें सिद्ध केलें होतें, पण काबीज केलेली सत्ता ताब्यात ठेवण्यासाठीं व टिकवण्यासाठीं जी कार्यक्षम व प्रभावी संघटना लागते, [illegible]

यामुळें क्रांतीच्या पहिल्या दोन महिन्यांत झालेल्या उठावाचा हळुहळू पाडाव होऊं लागला. ज्या ज्या ठिकाणी ब्रिटिश-सत्ता संपूर्णपणें नाहींशी झाली होती, तेथें ती फिरून प्रस्थापित करण्याचे प्रयत्न ब्रिटिशांनीं सुरू केले. या त्यांच्या प्रयत्नांत लाठीमार, गोळीबार मशीनगन्स, टॅंक्स, विमानातून बॉंब-हल्ले वगैरे अनेक प्रकारच्या आसुरी व अत्याचारी उपायांचा त्यांनीं अवलंब केला. बालीया जिल्ह्यांत त्यांनीं १०००० गोरे शिपाई आणून सबंध जिल्हाभर अत्याचाराचें राज्य बसविलें. नागपूर शहरात जवळजवळ मार्शल-लॉ पुकारला. बिहार प्रांतात लष्कराचा नंगा नाच सुरू झाला. मिदनापूर जिल्ह्यात गोऱ्यांच्या मदतीस वादळ पण आलें. महाराष्ट्र, कर्नाटक, मद्रास वगैरे भागांत जागोजागीं पोलिसांच्या व लष्करांच्या चौक्या बसवून लोकांत भीति व दहशत निर्माण करण्याचा प्रयत्न केला. पुणें, मुंबई, अहमदाबाद, सोलापूर वगैरे सर्व शहरांतून बिनदिक्कतपणे टॅंक्स फिरविण्यांत आले. ऑगस्ट-क्रांतीत पोलिसांनी केलेल्या या अत्याचाराचा व दडपशाहीचा एक स्वतंत्र इतिहासच लिहावा लागेल.

लोकधुरीण क्रांतीचे मार्गदर्शन करण्यासाठी भूमिगत झाले होते. जनतेचा प्रचंड उठाव त्यांनी पाहिला होता व त्या काळांत त्यांनी मार्गदर्शन पण केलें होतें. दुर्दैवानें जनतेची चाललेली पीछेहाट पण त्यांना पहावी लागत होती. अशा काळीं जनतेचें नैतिक धैर्य दळूं नये आणि पुढच्या उठावाचे मोर्चे बाधण्याचें आणि तात्पुरतें गनिमी युद्ध चालू ठेवण्यासाठीं संघटना व मार्गदर्शन करण्याचें अवघड, पण नाजुक काम या सर्व धुरंधर नेत्यांवर येऊन पडलें. आणि नेमक्या याच वेळीं जयप्रकाशजी त्याना येऊन मिळाले. हा दैवी योगायोगाच म्हटला पाहिजे कारण, अशा वेळीं चिकाटीनें, मेरूप्रमाणें अढळ धैर्यानें काम करणारा संघटनाचतुर नेता पाहिजे होता. आणि बाहेर येताक्षणींच ती जागा जयप्रकाशनीं भरून काढली. कशाही निराशेच्या अवस्थेंत परिस्थितीचें व आपल्या शक्तीचें योग्य मूल्यमापन करून, भावी कालाकडे दृष्टि ठेवून कामाला लागावयाचें हा तर जयप्रकाशजींचा महत्वाचा गुण आणि त्यास अनुसरून त्यांनीं त्या वेळेस स्वातंत्र्य-सैनिकास अचूक मार्गदर्शन केलें. ही गोष्ट त्यांनीं सुटून आल्याबरोबर 'सर्व स्वातंत्र्य-सैनिकास' म्हणून जें एक पत्रक प्रसिद्ध केलें आहे त्यावरून स्पष्ट होतें.

आपणाला माघार घ्यावी कां लागली याचें त्यांनीं फार मार्मिक विवेचन केलें असून, कार्यक्षम व पोलादि संघटनेचा अभाव, सत्ता काबीज केल्यानंतर ती टिकवून धरण्यासाठीं कार्यक्रमाचा अभाव, यामुळेंच आपला पहिल्या फेरींत पराभव झाला. तसेंच अंतिम समयीं, ब्रिटिशाना लष्करी सत्तेच्या जोरावरच आपली सत्ता टिकविणें भाग पडतें, तेव्हा लष्करात आपण काम केलें पाहिजे व

जनतेची प्रभावी आणि बलवान संघटना करून प्रतिसत्ता स्थापन करण्याचा व ती टिकविण्याचा प्रत्यक्ष कार्यक्रम दिला पाहिजे असें मत त्यांनीं प्रगट केलें. कार्यकर्त्यांना धीर देऊन, त्यांनीं केलेल्या कामगिरीचा गौरव करून पुन्हा नेटानें कामाला सुरवात करण्याचें अवघड कार्य त्यांनीं पार पाडलें.

जयप्रकाशजी सुटून आल्यानंतर थोड्याच दिवसात देशभर अस्वस्थता वाढूं लागली. महागाई व पदार्थांची टंचाई यामुळें जनतेतला असंतोष वाढेल आणि मार्चच्या सुमारास दुसरा उठाव होईल अशी त्यांनी कल्पना होती. बंगालमध्यें होणाऱ्या भयंकर दुष्काळाचीं पूर्व-चिन्हें दिसत होतीं तेव्हां या काळात गनिमी दलें तयार करून सरकारला हैराण करावें व जन-उठावाचें कार्य सुरू करावें, अशी त्यांनीं योजना आखली. याच सुमारास हिंदुस्थानभर मोडतोडींनी चळवळ फार मोठ्या प्रमाणात झाली. महाराष्ट्र-कटाचा खटला, पेशावर मेल, लाहोर केस, कर्नाटकातले व उत्तर हिंदुस्थानात अनेक खटले हें कशाचें द्योतक आहे ! आज आपण माघार घेत असलो, तर लवकरच दुसरा उठाव होणार आहे आणि त्याची तयारी करणें, व प्रतिकार–भावना कायम टिकणें या दृष्टीनें या Skirmishes ची जरूरी आहे असें जयप्रकाशांनीं आपल्या पत्रांत नमूद केलें होतें; आणि ते असें म्हणतात कीं, बिहारमध्यें त्यांनी फार मोठ्या प्रमाणात गनिमी–दलांची संघटना केली होती. वर्तमानपत्रांतून मार्चनंतर एकदा ते नेपाळमध्यें पकडले गेल्याची व पुन्हा सुटल्याची जी बातमी आली होती, त्यावरून पण या गनिमीदलांनाच वर्तुळ होतें, असा पण एक मसला आहे. असें सांगतात कीं, आपल्या गनिमीदलांची संघटना करण्यासाठी

ते नेपाळमध्यें गेले असताना एका ठिकाणीं ते ओळखले गेले व त्याना पकडून पोलिसानीं कचेरींत अडकवून टाकलें, पण ही बातमी शेजारच्याच गनिमीदलाच्या प्रमुखाला मिळाली, तेव्हा जयप्रकाशजींना सोडविण्यासाठीं त्यानें आपल्या दलासह पोलिस कचेरीवर हल्ला केला. या हल्ल्यात उभयपक्षीं बरीच झटापट होऊन काहीं लोक मारले पण गेले. पण, शेवटीं गनिमीदलानें पोलिसवर मात करून आपल्या प्रिय पुढाऱ्याला सोडवून नेलें.

जयप्रकाशजींनीं अपेक्षिलेला दुसरा जन-उठाव झाला नाही व क्रांतीच्या आणि प्रतिकाराच्या भावनेनें आपापसातले मतभेद विसरून जे अनेक काँग्रेस कार्यकर्ते एकत्र आले होते त्याच्यात एक धुसपुस सुरू झाली. हिंसा-अहिंसेचा वाद सुरू झाला. हे सर्व वाद बाजूस सारून सर्व लोकाना एकत्र आणण्याचा जयप्रकाशनीं प्रयत्न केला. आपल्याला संधि आली आहे, तेव्हा आपला समाजवाद किंवा समाजवादी पक्षाचें घोडें पुढें दामटावें अशी संधिसाधु वृत्ति त्यानीं कधींच दाखविली नाहीं. उलट समाजवादी पक्षातील काहीं उतावीळ व अननुभवी तरुण पक्षसंघटनच्या गोष्टी बोलूं लागले, तेव्हा जयप्रकाश व अच्युतराव यानीं त्याना गप्प बसविलें. समाजवादी पक्षाचें सारें पुण्य ऑगस्ट-क्रांतीच्या अग्निदिव्यात आपण ओतलें आहे. आपण त्या क्रांतींत विलीन झालों आहों, आणि म्हणून त्या क्रांतीची पूर्तता करणें हेंच आपलें पहिलें कर्तव्य आहे, असा विशाल दृष्टिकोन त्यानीं ठेवला होता.

अशा परिस्थितींत गांधीजींचा उपवास सुरू झाला. तेव्हां तर जयप्रकाश फारच अस्वस्थ झाले. म. गांधींचे व त्याच संबंध

फार जिव्हाळ्याचे होते. गांधीजींचे व त्यांचे कितीही मतभेद असले, तरी गांधीजींच्याबद्दल त्यांना अपार आदर व प्रेम वाटत होते. त्यामुळे त्यांना काही सुचेना. पण गांधीजी या उपवासातून सहीसलामत बाहेर पडले, तेव्हा त्यांच्या जीवात जीव आला.

गांधीजींच्या उपवासानंतर ऑगस्टमध्ये एकत्र आलेल्या कार्यकर्त्यांमध्ये मतभेद सुरू झाले. झाल्या या गोष्टी अहिंसेत बसतात किंवा नाही, याबद्दल मतभेद सुरू झाले. साहजिकच नवीन लढ्याची तयारी करतांना आपण कोणती भूमिका स्वीकारावी याबद्दलही मतभेद सुरू झाले. पण, हे मतभेद तीव्र न करता आपण जास्तीत जास्त एकसूत्रीपणाने व सहकार्याच्या भूमिकेवर काम करता आले तर पहावे, म्हणून जयप्रकाश व अच्युतराव यांनी बरेच प्रयत्न केले. पण *अहिंसेच्या बाबतीतले आपले मतभेद मूलभूत असल्यामुळे आपण एकत्र काम करणे कठीण आहे अशी* भूमिका काहींनी स्वीकारली, व शुद्ध सत्याग्रहाच्या भूमिकेवर काम करण्यासाठी अ० भा० सत्याग्रह कौन्सिल नावाची संस्था स्थापन करावी अशी भाषा पण काहीं लोक बोलूं लागले. पुढे लवकरच हे कौन्सिल स्थापनही झाले.

पण, आज ऑगस्टच्या लढ्याने देशांत एक नवे तंत्र व कार्यकर्त्यांची एक नवीन पिढी निर्माण केली आहे. सामान्य जनतेच्या सामुदायिक उठावावर सत्ता काबीज करावयाची आणि कार्यक्षम व बलवान संघटनेच्या जोरावर ही टिकवून ठेवायची. असे करतांना क्रांतिकारक दलें, कार्यक्षम सैनिकांचे गट तयार करणे, शेतकऱ्यांमध्ये, कामगारांमध्ये क्रांतिशील नेतृत्व निर्माण करणे, सैनिकांमध्ये देशप्रेमाचे वातावरण निर्माण करणे, या भूमिकेवर आवश्यक

एक वर्षाच्या अज्ञातवासाच्या कालांत जयप्रकाशनी साऱ्या तरुण कार्यकर्त्यांचें मोठ्या चातुर्यानें मार्गदर्शन केलें. आणि आज साऱ्या ऑगस्टवाद्यांचे ते आवडते पुढारी बनले आहेत. गांधी–नेहरूं-बरोबर आजचे तरुण, शेतकरी व विद्यार्थी जयप्रकाशजींचा जयजयकार केल्याशिवाय रहात नाहीत. ऑगस्ट–चळवळीनें आपल्या देशात ज्या प्रयत्नवादी स्वातंत्र्यसैनिकाची नवी परंपरा निर्माण केली आहे, त्याच्या निष्ठेचें मूर्त स्वरूप श्री. जयप्रकाशजींच्या ठायीं सांचविलेलें आहे.

*　　　*　　　*

९ नोव्हेंबर १९४२ रोजीं हजारीबाग जेलमधून फरारी झाल्यानंतर ते १९ सप्टेंबर १९४३ रोजीं लाहोरला परत पकडले गेले, तोंवर जयप्रकाशजींचा काल अज्ञातवासातच गेला. या कालांत त्यांनीं केलेल्या कार्याची सविस्तर माहिती तूर्त मिळणें कठीण आहे; पण वर्तमानपत्रांत त्यांच्याविषयीं एकदोन वेळा बातमी आली होती. एकदां बंगालचे त्यावेळचे मुख्य प्रधान श्री. फजलूल हक्क यांनीं असेंब्लीमध्यें प्रश्नोत्तराचे वेळीं श्री. जयप्रकाश हे कलकत्ता येथें आल्याचें सांगितलें; पण पोलिसांना ही बातमी फार उशीरा समजली व जेव्हा ते जयप्रकाशना पकडण्यासाठीं तेथें आले तेव्हां त्यांनीं कलकत्ता शहर सोडलें होतें.

दुसरी बातमी नेपाळसंबंधीं. याशिवाय याच अवधींत श्री. जयप्रकाश यांनीं लिहिलेलें एक पत्रक म्हणून सरकारनें प्रसिद्ध केलें आहे. या पत्रकावरून आपल्या सहकाऱ्यांना योग्य तें मार्गदर्शन करण्याची क्रांतिकारक नेत्यांची थोरवी स्पष्ट दिसून येते. ज्या सारखेचें हें पत्रक आहे, त्यावेळीं क्रांतीची लाट ओसरली होती व

# ११. लाहोरच्या किल्ल्यांत

जवळ जवळ एक वर्षभर अज्ञातवासात काढल्यानंतर एके दिवशीं (१६ सप्टेंबर १९४३) जयप्रकाशजी पकडले गेल्याची बातमी आली. लाहोर स्टेशनवर मुंबई सरकारच्या वारंटाखालीं जयप्रकाशना पकडण्यात आलें. पण, पंजाब सरकारनें मुंबई पोलिसांच्या ताब्यात त्याना देण्याचें नाकारलें. जयप्रकाशजींना आपण पकडावें म्हणून निरनिराळ्या प्रान्तिक सरकारामध्यें किती चुरस लागली होती पहा !

लाहोरच्या किल्ल्यात जयप्रकाशना नेऊन टाकल्यानंतर तेथें एका अंधारकोठडींत त्याना ठेवण्यात आलें आहे. यापलीकडे कांहीं बातमी कधींच कुणाला मिळाली नाहीं. जयप्रकाश नारायण यानीं केलेला हेबियस कॉर्पसचा अर्ज सुनावणीस निघाला असताना त्याचे वकील श्री. भुलाभाई देसाई हे म्हणाले कीं, जयप्रकाशना कोणत्या अधिकाऱ्यानीं पकडलें याची सुद्धां अजून कुणाला माहिती नाहीं. त्याची व्यवस्था कशी ठेवण्यात आली आहे, याच वर्तीत बरेच दिवस कोणालाच कांहीं बातमी नव्हती. इतकेंच काय, पण त्याच्या संबंधीं कसलीच हकीकत जनतेच्या कानावर जाऊं नये म्हणून सरकार फारच दक्ष होतें. त्याहिपुढें जाऊन त्याच्या वतीनें प्रथम हेबियस कॉर्पसचा अर्ज करण्यास गेलेल्या डॉ. पार्डीवाला यानाच सरकारनें पकडून स्थानबद्ध केलें. इतकी सरकारची त्यांच्यावर कडक नजर होती. आणि सरकारनें त्याना

अतिशय वाईट तऱ्हेनें वागवून त्यांचे अनन्वित हाल केल्याच्या गोष्टी १९४४ च्या ऑक्टोबरमध्यें मध्यवर्ति असेंब्लीमध्यें जी प्रश्नोत्तरें झाली त्यावरून व नंतर त्याचा अर्ज सुनावणीस निघाला असता कोर्टापुढें आलेल्या पुराव्यावरूनच आपणास माहीत झाल्या.

'मध्यवर्ति असेंब्लीमध्यें अनेक सभासदांनीं गृहमंत्र्यास हे प्रश्न विचारले, त्याची गृहमंत्र्यांनी आपल्या परंपरेस अनुसरून टाळाटाळीचीं उत्तरें दिली, हें जरी खरें असलें तरी त्यांवरून नवीन माहिती मिळाली. त्यांची प्रकृति ठीक आहे; त्यांना वाचावयास देण्यांत येतें वगैरे ठराविक ठशाचीं उत्तरें मिळालीं; पण त्यांचे हालांना

सप्टेंबरमध्यें ज्या हुकुमाखालीं पकडण्यांत आलें तो हुकूम बदलून त्याना १८१८ च्या कायद्याखालीं स्थानबद्ध करण्यात आलें होतें. हेतु हा कीं, त्यांची केस 'हायकोर्टच्या' मर्यादेंतसुद्धा येऊं नये व पोलिसाना अनियंत्रितपणें त्याचे हाल करतां यावेत. आणि नंतर १ जुलै १९४४ ला तर पंजाब सरकारच्या मुख्य सेक्रेटरींनीं एक हुकूम काढून जयप्रकाशना सरळच पंजाब सी. आय्. डी. च्या डेप्युटी इन्स्पेक्टर जनरलच्या ताब्यात दिलें. अगोदरच सी. आय्. डी. आणि त्यात पंजाबचे! मग श्री. जयप्रकाश याचे हाल किती झाले असतील याची कल्पनाच करायला नको.

'जयप्रकाश नारायण याचा अर्ज चालविणारे श्री. जीवनलाल कपूर हे त्यांच्या अर्जासंबंधीं काहीं सूचना घेण्यासाठीं जेव्हा जयप्रकाशना भेटण्यास आले, तेव्हा पोलिस अधिकारी तेथून हालण्यास तयार होईनात. कारण, त्याना भीति होती कीं, हा आपलीं राक्षसी कृत्यें सांगणार. जयप्रकाशजींची पोलिस–तपासणी ५० दिवसपर्यंत चालली होती. या अवधींत त्याचा अन्न, झोंप या व इतर बाबतींत नानाप्रकारचा छळ करण्यात आला. या ठिकाणीं असताना त्याना दिवसभर कोंडून ठेवण्यात येत असें व आपणास ठराविक वेळ तरी मोकळी हवा मिळावी असा जयप्रकाशानीं अर्ज केला असता तो प्रथम फेटाळून लावला गेला व नंतर हातकड्या घालून एक तास लहानशा क्षेत्रात फिरण्याची मोकळीक देण्यात आली. तेव्हा आपण हातकड्या घालून घेण्यास तयार नाहीं, आपणास फिरावयास नाहीं मिळालें तरी चालेल असें जयप्रकाशनीं सांगितलें पण, तुरुंगाधिकाऱ्यानीं त्यांना सक्तीनें हातकड्या घालून सक्तीनें फिरावयास लावलें.

नंतर जयप्रकाश नारायण याना लाहोरच्या किल्ल्यामधून आग्रा जेलमध्ये नेण्यांत आलें. ही त्यांची बदली पण अगदीं कडेकोट बंदोबस्तात करण्यात आली होती. या ठिकाणीं त्यांचे सहकारी डॉ. राममनोहर लोहिया पण त्यांचेबरोबर आहेत. मध्यंतरीं डॉ. लोहियाची प्रकृति अतिशय बिघडली होती. पण, सरकार त्याना सोडण्यास तयार नाहीं. जयप्रकाशजींना आपल्या बधूशीं किंवा पत्नीशीं सरळ पत्रव्यवहार करतां येत नाहीं. जयप्रकाशजींचे बंधु श्री. राजेश्वरप्रकाश म्हणाले कीं, "आमचा पत्रव्यवहारसुद्धा सरकार-तर्फेच चालतो. मला माझा भाऊ कोठें आहे, हें वर्तमानपत्रा-वरूनच समजतें." पण अलिकडे त्यांच्या पत्नींना जयप्रकाश-जींची भेट घेण्याची परवानगी मिळालेली दिसते.

## १२. खाजगी जीवन

समाजाच्या उद्धाराकरिता जीवाचें रान करीत वणवण हिंडणाऱ्या थोर महात्म्यांना खाजगी जीवन काहीं वेगळे असतें असें म्हटलें, तर तें वेडगळपणाचेंच ठरेल तरीपण माणूस कितीही थोर असला तरी, त्याची काहीं वैयक्तिक वैशिष्ट्यें असतातच व क्वचित् खाजगी जीवनात पण काहीं गंमतीदार प्रसंग घडतात.

जयप्रकाशजींच्या बालपणामध्यें काहीं विशेष घडल्याचें माझ्या तरी ऐकिवात नाहीं. १९२० सालीं ते कॉलेज सोडून असहकाराच्या चळवळींत पडले व २२ सालीं ते अमेरिकेंत गेले. म्हणजे वयाच्या एकोणिसाव्या वर्षापासून कौटुंबिक जीवनाला ते मुकलेच. १९२९ सालीं परत आल्यानतर काहींतरी नोकरी करावी, व वडिलांना सुख देऊन कौटुंबिक आनंदाचा लाभ घ्यावा अशी भावना काहीं काळपर्यंत त्यांच्या मनामध्यें जोरदार होती. पण, परिस्थितीच्या तडाख्यापुढें व्यक्तीच्या कल्पनांचा चक्काचूर होतो. आणि ३० सालीं झालेल्या प्रचंड आंदोलनामुळें जयप्रकाशजींचे ते विचार विरून गले

१९३० सालापासून आजपर्यंत १५ वर्षे अव्याहतपणें धकाधकीचें जीवन जयप्रकाशजी व्यतीत करीत आहेत, कौटुंबिक जीवनाची त्यांना कधीं आठवण तरी झाली असेल कीं नाहीं याची शकाच आहे. आणि जरी यदाकदाचित् झाली असली

तरी कर्तव्याच्या पुढें असले मोह जयप्रकाशसारख्या थोरांना थोडेच पाशांत पाडणार !

इ. स. १९१९ साली वयाच्या अवघ्या १८ व्या वर्षी जयप्रकाशजींचें लग्न झालें. पण पहिली दोन वर्षे सोडून दिलीं तर वयाच्या वीस वर्षांच्या वैवाहिक जीवनांत पत्नीशीं कधीं मोकळे-पणानें बोलायला त्यांना वेळहि मिळाला नाहीं. पण, पत्नीशीं प्रेमाच्या गप्पागोष्टी करण्यापेक्षां अधिक महत्वाचें कार्य करण्यांत आपला पति गर्क आहे, आणि त्यातच आपणही समाधान मानण्यांत आपली थोरवी आहे असें समजून वागणारी थोर पत्नी त्यांना लाभली हेंही त्यांचें भाग्यच समजलें पाहिजे !

प्रभावतीदेवी स्वतःपण राजकारणांत जातीनें लक्ष घालतात. समाजसेवेची त्याना फार आवड आहे. जयप्रकाश अमेरिकेत गेल्यानंतर त्या स्वतः गांधीजींच्या जवळ त्यांच्या आश्रमांत मजेंत राहिल्या होत्या. गांधीजींच्या विचारसरणीचा त्यांच्यावर फार परि-णाम झाला. ३० साली त्या सत्याग्रह करून तुरुंगात गेल्या होत्या. त्यावेळीं जयप्रकाश अज्ञातवासात होते. एकदा जयप्रकाश आणि प्रभावतीदेवी यांचें थट्टेत बोलणें चाललें होतें कीं, दोघांपैकीं जास्त प्रेम कोण करतें. तेव्हां थट्टेनें प्रभावतीदेवी म्हणाल्या, "तुम्ही तुरुंगात असताना मी दोनदा तुम्हाला भेटा-वयास आलें होतें; पण मी तुरुंगात असताना तुम्ही बाहेर असून सुद्धां भेटावयास आलांत का ?" "अग, पण मी त्यावेळीं कसा येणार ! माझ्यावर वॉरंट नव्हतें का !". जयप्रकाश म्हणाले. "तर ! बायकोपेक्षां तुम्हाला आपल्या कार्याची महती जास्त !"

तीस सालच्या चळवळींत जयप्रकाशजी पकडले गेल्याची वार्ता

ऐकून त्या धक्क्यानें त्यांच्या मातोश्री मरण पावल्या. घरीं जयप्रकाशजींचे वडील आजारी, नवरा आणि दीर दोघेही तुरुंगात. अशा वेळीं प्रभावतीदेवी अगदीं गोंधळून गेल्या. पण त्या चिडल्या नाहींत. शांतपणानें याहीपेक्षा मोठीं संकटें आपल्याला सहन करावयाचीं आहेत आणि त्यातच आपली खरी कसोटी आहे, याची त्यांना जाणीव होती.

जयप्रकाशजी व प्रभावतीदेवी यांच्यात कितीतरी मतभेदाचे मुद्दे आहेत. स्वतः जयप्रकाश पक्के समाजवादी, तर प्रभावतीदेवी संपूर्ण गांधीवादी. प्रभावतीदेवींना मांसाहार निषिद्ध, तर जयप्रकाशना मधून मधून मांसाहाराची लहर येते. पण म्हणून, त्या दोघांच्या जीवनात तंटेबखेडे कधींच झाले नाहींत. राजकारणांतले मतभेद खाजगी जीवनात आणू नयेत अशी समजूतदार वृत्ति दोघांनींहि बाणवली आहे.

एकदा जयप्रकाशजींना विचारलें, "तुम्ही स्वतः तर समाजवादी आणि तुमच्या पत्नी कशा गांधिवादी!" यावर हंसून जयप्रकाश म्हणाले, "नवऱ्याचीं राजकीय मतें बायकोनें मान्यच केलीं पाहिजेत, असा माझा दुराग्रह नाहीं" ह्याच गृहस्थानें प्रभावतीदेवींना विचारलें, "आपल्या राजकीय मताकरितां पतीशीं भांडण करण्याची पाळी आली तर काय कराल?" "अशी पाळी मुळीं येणारच नाहीं," त्या म्हणाल्या. आणि त्यातच त्यांच्या वैवाहिक जीवनाचें सार साठविलेलें आहे. राजकीय मतभेद कितीही असले तरी परस्परावरचें प्रेम आणि विश्वास अढळ असल्यामुळें त्यांच्या वैवाहिक जीवनात कटुता कधींच निर्माण झाली नाहीं.

कामाच्या गर्दीमुळें जयप्रकाशना घरीं रहावयास तर कधींच वेळ होत नसे. जयप्रकाशजी सुटून आल्यानंतर पाटण्याला त्यांचे अनेक नातेवाईक त्यांना भेटण्यास आले होते आणि कांहीं घरगुती कामासाठीं त्याचे नातेवाईक थांबले होते. पण सकाळीं सर्वांच्या अगोदर उठून बाहेर पडणाऱ्या जयप्रकाशना घरगुती कामें हातावेगळीं करण्यास सवडच झाली नाहीं. रात्रीं एक दीड वाजेपर्यंत त्याचे नातेवाईक वाट पहात जागे रहात. पण बिचारे कंटाळून झोपले तरी जयप्रकाशजींना वेळ झाला नाहीं.

आहाराच्या बाबतींत त्याचे विचार दिवसेंदिवस बदलत चालले आहेत. आवडीनें मांसाहार त्यांनीं कधींच केला नाहीं. पण पूर्वी कधींकधीं त्यांना मांसाहाराची लहर येत असे. अर्थात् प्रभावतीदेवींना हा प्रकार म्हणजे अगदीं अट्टाकार! त्यामुळें मांसाहार करण्याची कधीं लहर आली कीं ते एखाद्या हॉटेलांत जेवण्यास जात. पण, हल्लीं पोटाच्या तक्रारीमुळें मांसाहाराबद्दलची त्याची आवड पूर्णपणें नाहींशी झाली आहे. आणि कमी शिजवलेल्या भजावर त्याचा फार भरंवसा आहे. त्याना धूम्रपानाखेरीज इतर कसलीच संवय नाहीं. आणि धूम्रपानही ते अगदींच माफक प्रमाणांत करतात. पण धूम्रपानाच्या बाबतींत त्यांना ५५५ शिवाय दुसरी सिगरेट मात्र चालत नाहीं.

जयप्रकाशना, गाण्याचा फारच शोक आहे. तास तास कविता किंवा गाणें ऐकत बसण्याचा त्याना नाद आहे. गाण्याखेरीज इतर कोणत्याही प्रकारची करमणूक त्याना आवडत नाहीं. विद्यार्थीदशेंत तर ते सिनेमामुद्दां पहात नसत. गाण्याप्रमाणें फोटोग्राफीबद्दलही त्याना फार प्रेम वाटतें. टापटीप आणि स्वच्छता यांच्यावर त्यांचा फार कटाक्ष आहे. कित्येक वेळां सकाळीं उठून सगळें घर साफ करण्यात त्यांनीं तासन्तास घालवले आहेत!

जयप्रकाश स्वतः फारच साधेपणानें राहातात. अमेरिकेंतून परत आल्यापासून त्यानी पँट व सूट सोडून दिले आणि साधें धोतर व कुडतें इतका साधा पोषाक त्यानी ठेवला आहे. त्यांच्या वैयक्तिक आचारविचारावर गांधींजींच्या विचाराचा फार परिणाम झाला असून व्यक्तीचें वैयक्तिक जीवन नैतिकदृष्ट्या उच्च असलेंच पाहिजे, आणि समाजकार्य करणाऱ्यानें साधेपणानें राहिलें पाहिजे, असा त्याचा कटाक्ष आहे.

त्याना दोन फार गमतीदार खोडी आहेत एक दाढीच्या सामानाबद्दल आणि दुसरी बुटाबद्दल. स्वतःजवळ उत्तम असा दाढीचा सेट असला पाहिजे आणि रोज साफ दाढी केली पाहिजे अशी त्याना संवय आहे. तसेंच, रस्त्यावरून जाताना एखाद्या चांभाराच्या दुकानात जर बुटाची उत्तम जोडी दिसली, तर ती खरेदी करण्याचा मोह त्याना आवरत नाही मग ती जोडी आपल्याला पुरेल किंवा नाही याचाही ते विचार करीत नाहींत !

जयप्रकाशजींना हिंदी, उर्दू, इंग्रजी आणि बंगाली अशा चार भाषा उत्कृष्टपणें समजतात. ते स्वतः हिंदी फारच चांगल्या-रीतीनें लिहितात. त्याचें वाचनही फार दांडगें असून चर्चा आणि वादविवाद करण्याची त्याना फारच हौस आहे.

राजकीय मतभेद खाजगी जीवनात ते कधीच आणीत नाहींत, पण राजकीय मतभेद असले तरीसुद्धा जुन्या काँग्रेस पुढाऱ्यांपैकीं राजेंद्रबाबूंच्याबद्दल त्याना फारच निष्ठा आहे. गांधीजींच्याबद्दल त्याना अपरंपार आदर आहे. तसेंच लहानांपासून थोरापर्यंत कोणताही माणूस असला तरी सर्वांना ते बरोबरीनें वागवतात. यामुळें इतक्या विचित्र लहरीच्या, अनेक मतभेदाच्या, सर्व प्रकारच्या राजकीय आणि खाजगी सहकाऱ्यांमध्ये ते फारच लोकप्रिय झालेले आहेत.

# १३. मूल्यमापन व राजकीय कार्य

सहा फूट उंचीचा तरुणाचा हा आवडता पुढारी आता खंगत चालला आहे. गेल्या दहा वर्षांत सतत शारीरिक क्लेश, तुरुंगवास व उपवास यानीं त्याची प्रकृति आतां खालावली आहे. पण याचा उत्साह आणि तळमळ मात्र तिळमरही कमी झाली नाहीं. जयप्रकाशजींचें वय आता ४५ वर्षांचें असेल, पण, एवढ्या वयात त्याचे डोकीचे सर्व केस पांढरे झाले आहेत. त्यामुळें याच्या भव्य आणि शांत मुद्रेला अधिकच गांभीर्य येतें.

जयप्रकाशजींचें भाषण फारच थोड्यानीं ऐकलें असेल. वक्तृत्व म्हणून ज्याला म्हणतात, तो गुण त्याच्या अंगी फारसा नाहीं; पण मनाची तळमळ आणि कळकळ त्याच्या भाषणात ओतलेली असते. ते सहसा फारसें बोलणार नाहींत. पण जें बोलतील त्यात स्वतःच्या कार्याविषयी त्याची तळमळ इतकी तीव्रतेनें दिसून येतें की, ऐकणाऱ्याच्या मनावर परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं.

लेखक या दृष्टीनें जयप्रकाशजींचें कार्य काहीं फार नाहीं. त्यांचा लेखनसंभार म्हणजे त्यांनीं लिहिलेलें "Why Socialism?" हें पुस्तक आणि "Congress Socialist" मध्यें त्यांनीं वेळोवेळी लिहिलेले लेख. त्यांची लिहिण्याची पद्धत अगदीं साधी व सरळ आहे. ज्या विषयावर ते बोलतात किंवा लिहितात, त्या विषयाचा त्यांचा अभ्यास फार दांडगा असतो, ही गोष्ट स्वतः बाबूजींनीं कबूल केली आहे. "If he does not know

anything on Socialism, then nobody in India knows it." असें गांधीजींनी म्हटलें आहे. आपल्या विषयाचा संपूर्ण अभ्यास, बोलण्यांतील किंवा लिहिण्यातील कळकळ, तडफ व साधेपणा यामुळें ऐकणाऱ्याच्या किंवा वाचणाऱ्याच्या मनावर ते ताबडतोब परिणाम करूं शकतात.

जयप्रकाशजी कधींही आडवळणानें जाणार नाहींत किंवा बोलणार नाहीं. त्याचें लिहिणें असें साधें व सरळ असतें, तसेंच तें स्पष्ट असतें. स्वतःला जे बरोबर किंवा चूक वाटेल तें स्पष्टपणें बोलून दाखवण्यात त्यांनीं कोणाचीही भीडभीड बाळगली नाहीं. पण टीका करताना त्यांनीं कुत्सितपणा कधींच दर्शविला नाहीं. याच त्याच्या गुणामुळें कॉंग्रेस मंत्रीमंडळावरचीं त्याची टीका, किंवा गांधीजींवर त्यांनी वारंवार केलेली टीका अगदीं स्पष्ट व सडेतोड होती. पण, त्या टीकेमागें एक कळकळीचें हृदय होतें ही गोष्ट गांधीजींना माहीत असल्यामुळें त्यांनी जयप्रकाशजींवर कधींच राग धरला नाहीं उलट शेवटपर्यंत ते गांधीजींना प्रियच आहेत. सर रिचर्ड टॉटनहॅमला गांधीजींनीं पाठवलेल्या उत्तरात त्यांनीं जयप्रकाशबद्दल काढलेले उद्गार वाचनीय आहेत.

"मी मुद्दाम श्री. जयप्रकाशजींचें उदाहरण घेत आहें. कारण त्यांनीं स्वतः लिहिल्याप्रमाणेंच अनेक मूलभूत मुद्यावर त्याचा माझ्याशीं मतभेद आहे. पण माझे त्याच्याशीं कितीही मतभेद असले, तरी त्याचें धैर्य किंवा देशासाठीं सर्वस्वाचा त्याग करण्याची त्याची भावना या गुणाकडे मी डोळेझाक करूं शकत नाहीं. मी त्याचा जाहीरनामा वाचला आहे. जरी त्याच्या कांहीं विचाराशीं

मी सहमत होऊं शकत नाहीं, तरीसुद्धां जळजळीत स्वदेशप्रेम आणि स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं वाटणारी अत्यंत आतुरता सर्वत्र दिसून येते. असा हा माणूस व त्याचे हे गुण ह्यावद्दल कोणत्याही देशानें अभिमान बाळगावा." जयप्रकाशजींचे यापेक्षां यथायोग्य मूल्यमापन कोणीच करूं शकणार नाहीं. देशाच्या स्वातंत्र्याकरितां अहोरात्र झटणारा, असेल नसेल त्या सर्वस्वाचा त्याग केलेला, हा वीर गांधीजींना प्यार नसेल तरच तें नवल!

हातीं घेतलेलें कार्य तळमळीनें करण्यांत जयप्रकाशजींचें जीवन-सर्वस्व साठवलेलें आहे. मग त्याकरतां कितीही त्याग करावा लागला, कितीही क्लेश सहन करावे लागले, कितीही टीका सहन करावी लागली, तरी त्यांनीं मागेंपुढें पाहिलें नाही. समाजवादी पक्षाचा गेल्या दहा वर्षांचा इतिहास म्हणजे जयप्रकाशजींच्या या गुणाचें उत्कृष्ट दर्शन आहे. कम्युनिस्टांनीं त्यांच्यावर वाटेल ती टीका करून वाटेल ते आरोप केले. सुधारणावादी कॉंग्रेसवाल्यांनी त्यांच्या मार्गांत अडथळे आणण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या स्वतःच्या पक्षाची सांपत्तिक स्थिति अगदीं हलाखीची होती. सर्व कार्यकर्ते अननुभवी होते; पण ते डगमगले नाहीत. विचार-

पण तरुणांच्या सुप्त शक्तींना हात घालून, जीवापाड मेहनत करून हाताशी असलेल्या लोकाना योग्य तें शिक्षण देऊन, त्यांनीं कॉंग्रेस समाजवादी पक्षाच्या रूपानें एक नवीनच शक्ति निर्माण केली.

कम्युनिस्ट पक्षाकडे पाहिलें, तर तेथें एका प्रकारची हुकुम-शाही व जुलूम दिसतो, तसें जयप्रकाशजींच्या पक्षांत नाहीं. स्वतः जयप्रकाश, मसानी, अशोक मेहता, अच्युत पटवर्धन यांच्यामध्यें काहीं बाबतींत महत्त्वाचे मतभेद होते. पण मत-भेदाचा बाऊ न करता आपणाला एक विशिष्ट कार्य करावयाचें आहे, हीच भावना त्यांनीं अधिक कसोशीनें पोसली व त्यामुळें त्याचे सहकार्य अधिक हार्दिक झालें. व समाजवादी पक्ष म्हणजे एकविचारानें एका कार्यासाठीं झटणाऱ्या हजारों कार्यकर्त्यांचें एक विशाल कुटुंब बनलें. हीच खरी सहकार्याची भावना

कॉंग्रेस समाजवादी पक्षाच्या सर्व नेत्यामध्यें जयप्रकाशना तात्त्विक भूमिकेचें आकर्षण अधिक आहे. पण ते काहीं हटवादी नाहीत. लोकाच्या भावना काय आहेत हेही त्याना चटकन् समजतें. संकुचित गटबाजीला त्याचा तीव्र विरोध आहे. या त्याच्या विरोधामुळेंच पुढें पुढें त्याना कम्युनिस्टाबद्दल घृणा वाटूं लागली. या त्याच्या गुणामुळेंच कॉंग्रेस समाजवादी पक्ष हा एक संकुचित पंथ न राहता एक विशाल चळवळ झाली. या चळवळीच्या पंखाखालीं दिवसेंदिवस देशातील अधिक अधिक बहाल लोक येत आहेत, याचें बरेंचसें श्रेय जयप्रकाशनीं पोसलेल्या विशाल दृष्टिकोनास दिलें पाहिजे.

# १४. राजकारणांतलें स्थान

हिंदी राष्ट्रीय चळवळींतील जयप्रकाशजींच्या कार्याचें मूल्यमापन करणें हें काम बरेंच अवघड आहे. १९३२ सालच्या सत्याग्रहाचा लढा फसल्यानंतर जयप्रकाशजींच्या खऱ्या राजकीय कार्यास सुरवात झाली. त्यावेळीं हिंदुस्थानचें राजकीय तंत्र कोणत्या स्वरूपाचें असावें, असा प्रश्न उभा राहिला. साम्राज्यान्तर्गत गुलाम देशाच्या राजकारणाच्या अपरिहार्य मर्यादामुळें स्वराज्यपक्षाचा सनदशीर धोरणाकडे नैसर्गिक कल झुकूं लागतो. अशा कांहीं स्वभावप्रवृत्तींना आळा घालण्यासाठीं जयप्रकाशनी कॉंग्रेसच्या अधिवेशनांत जाहीरपणें सुरवात केली. ब्रिटिश साम्राज्याशीं अनेकदां जीवनमरणाचे लढे करावे लागतात; व त्यासाठीं आपण जनता-संघटन करून कॉंग्रेसच्या नेतृत्वाखालीं संघटनात्मक कार्य व लढाऊ वृत्ती यांचा परिपोष केला पाहिजे, हा दृष्टिकोन मुंबई कॉंग्रेसमध्यें व त्यानंतर कॉंग्रेसच्या प्रत्येक अधिवेशनांत श्री. जयप्रकाशनीं आपल्या प्रभावी वाणीनें मांडला. कॉंग्रेस समाजवादी

काँग्रेसचा गाडा सनदशीरपणाच्या मार्गावर जात असताना काँग्रेसमध्येंच राहून लढाऊ वृत्तीच्या तरुणांना तडजोडीच्या राजकारणापासून दूर ठेवण्याचें अमोल कार्य जयप्रकाशनी केलें आहे. सतत १० वर्षेपर्यंत देशभर लढाऊ वृत्तीचा, तडजोडीच्या राजकारणाबद्दल अविश्वासाचा, लढ्याच्या अपरिहार्यतेचा दृष्टिकोन त्यानीं हिंदी तरुणापुढें तेवत ठेवला. आणि स्वराज्य ब्रिटिशांच्या संमतीनें घेऊं म्हटलें, तर यावचन्द्रदिवाकरौ आपणाला वाटच पहात बसावें लागेल, अशी हाडाच्या सनदशीर काँग्रेस जनांची सुद्धा खात्री झाली. नेमस्तांचासुद्धां या बाबतींत भ्रमनिरास झाला. आणि या वृत्तीला गांधीजींच्या स्फूर्तिदायक नेतृत्वामुळें आत्मविश्वासाचा नैतिक आधार मिळाला. परिस्थितीच्या अपरिहार्य प्रवाहानें आपला दूरदर्शी दृष्टिकोन वास्तवतेच्या कसोटीवर घासला जाऊन यथार्थ ठरला, याबद्दल जयप्रकाशांना केवढी धन्यता वाटली असेल!

त्याचप्रमाणें हिंदुस्थानचा प्रश्न हा जागतिक वातावरणापासून दूर ठेवता येणार नाहीं, आपला स्वातंत्र्याचा प्रश्न हा आंतरराष्ट्रीय स्वरूपाचा झाला आहे. या व्यापक भावनेचा पण त्यानीं प्रचार केला. पं. जवाहरलाल नेहरू यांचा आंतरराष्ट्रीय दृष्टिकोन, जाति, वर्ण व वर्गविहित स्वातंत्र्य हें एक अमोल तत्त्व आहे. आफ्रिका व आशिया गुलामगिरींत पिचत असतांना, चीन व स्पेन आक्रमक गुण्डांची शिकार बनत असताना कोणाच्याच स्वातंत्र्याची शाश्वति राहणार नाहीं, म्हणून जागतिक चिरशांतीच्या पार्श्वभूमीवरच हिंदी स्वातंत्र्यसंग्राम आधारला पाहिजे हा आक्रमणविरोधी दृष्टिकोण त्यानीं देशभर प्रचारला. प्राणापेक्षाहि

अधिक मोलाची हीं सामाजिक मूल्यें आहेत. त्यांच्या सिद्धीसाठीं प्राणाचीही पर्वा न करता जयप्रकाश लढत राहिले.

पण हीं दोन्ही कार्ये करीत असतांना उगाच योड्यायोड्या मतभेदावरून व जहाल घोषणांना बळी पडून जयप्रकाशांनी, स्वातंत्र्याची, राष्ट्रीय चळवळीची अभंग फळी फुटूं दिली नाहीं यांत त्यांची खरी थोरवी आहे. आपली मतें दूरगामी महत्वाची व सत्य ठरणार आहेत, ही त्यांना खात्री होती. आत्मविश्वास होता, पण आपल्या मतांना देशात असावा तेवढा पाठिंबा नाहीं याची पण त्याना जाणीव होती. तेव्हां मताचा दुराग्रह धरून काँग्रेस-मधून फुटून बाहेर पडून कॉंग्रेसची शक्ती कमी करण्याची चूक त्यांनी कधींच केली नाहीं. कॉंग्रेस हीच खरी आपल्या राष्ट्रीय लढ्याची जननी आहे व तिची शक्ति वाढविण्यासाठीं योग्य तीं पावलें टाकली पाहिजेत याची त्याना जाणीव होती. व म्हणून वेळीं अवेळीं आपल्या शक्तीची जाणीव न देतां, कॉंग्रेसमधून न फुटता कॉंग्रेसचे अखंडत्व कायम ठेवून आपल्या मताचा व संघटित जनतेचा दाब कॅंग्रेसवर आणून कॉंग्रेसला संपूर्णपणें साम्राज्यविरोधी बनविण्याचा प्रयत्न करणें हीच त्यांची राष्ट्रीय चळवळींतील महत्वाची कामगिरी आहे. ही कामगिरी पार पाडीत असतांना समाजवादी विचारसरणीचा प्रचार करून जास्तीत जास्त कार्यकर्त्यांना समाजवादी विचारसरणी पटवून देऊन भावी सामाजिक क्रान्तीची तयारीपण त्यांनीं करून ठेवली आहे.

आगस्ट १९४२ च्या लढ्यानें तर हिंदी राजकारणांत त्यांचें स्थान फारच महत्वाचें झालें आहे. १९३० पासून १९४१ पर्यंत समाजवादाचा प्रचार करणाऱ्या आणि कॉंग्रेसला लढाऊ मार्गावर

नेऊं इच्छिणाऱ्या एका गटाचे अध्वर्यू म्हणून काँग्रेसच्या राजकारणांत त्याना मान होता, यांत शंका नाहीं. पण १९४२ च्या 'चलेजाव' ठरावात काँग्रेसनेंच किसान-कामगार राज्याची कल्पना मान्य केली आहे. आणि पूर्वी समाजवादी ज्या घोषणा देत होते व ज्या तत्वाचे प्रतिपादन करीत होते, त्या गोष्टींचा आतां सबंध काँग्रेसनेंच स्वीकार केला आहे. पण म्हणून कांहीं जयप्रकाशजींचे वैशिष्टयपूर्ण स्थान नाहींसें झालें नाहीं. कारण नुसत्या घोषणाच्या राजकारणावर काहीं त्याचें महत्त्व अवलंबून नव्हतें. नुसत्या जहाल घोषणा करणारे तथाकथित क्रांतिकारक ४२ साली सरकारचे हस्तक बनून जनतेच्या तिरस्कारास पात्र झाले. पण आपलीं तत्वें अमलात आणण्याची अमोल संधि आली आहे, हें पाहून प्राणाची पर्वा न करतां हजारीबाग तुरुंगाच्या भिंती उल्लघून जयप्रकाशजींनीं समरांगणांत उडी घेतली आणि त्यातच—कर्तृत्वातच—त्याचें मोठेपण साठविलें आहे. आणि ऑगस्टच्या ठरावानें जयप्रकाशजींच्या भव्य व क्रांतिवादी ध्येयवादाचा अवलंब काँग्रेसनें केला असला तरी तशीच भव्य आणि क्रांतिवादी संघटना त्याच्या पूर्ततेसाठीं उभी करावी लागते. तुरुंगातून सुटून आल्यानंतर काँग्रेस वर्किंग कमिटीच्या नेत्यानीं त्या भव्य ध्येयाचा पुनरुच्चार केला असला, तरी क्रांतिसंघटनेचें तंत्र कार्यक्षम व पूर्ण करण्यासाठीं आज झटणारे हजारों तरुण ऑगस्टवादी काँग्रेस कार्यकर्ते मार्गदर्शनासाठीं ज्याचेकडे पहातात, त्याच्यामध्यें जयप्रकाशजींचें स्थान अग्रेसर आहे. म्हणून सनदशीर राजकारणाच्या काळीं जरी जयप्रकाश मागें पडतात असें वाटलें, तरी

त्याकाळीं सुद्धा ध्येयसिद्धीच्या ज्या एका नवीन उद्योगपर्वाचें युग काँग्रेसमध्यें निर्माण झालें आहे ह्या पर्वाचे एक महान् प्रवर्तक म्हणून काँग्रेसच्या राजकारणात--विशेषतः भावी इतिहासका-राच्या मूल्यमापनात--त्याना फार महत्त्वाचें स्थान आहे.

एकंदर हिंदी राजकारणाप्रमाणेंच, क्रांतिकारक राजकारणात पण जयप्रकाशजींचें स्थान फारच महत्त्वपूर्ण आहे. परवा मुंबई येथें कॉं. समाजवादी पक्षाच्या सुटलेल्या सभासदाची एक सभा भरली होती, तेंव्हा जयप्रकाश सुटल्याखेरीज आपण त्याबाबत कोणताही महत्त्वाचा निर्णय घेऊं नये असें एकमतानें ठरलें. शिवाय आचार्य नरेंद्रदेवासारख्या जुन्या व विद्वान समाजवादी पुढाऱ्याना सुद्धा त्याच्याबद्दल किती आदर वाटतो यावरून त्याच्या पक्षातही त्यांचें स्थान किती महत्त्वपूर्ण आहे हें स्पष्ट होतें.

# परिशिष्ट १

## काँग्रेस समाजवादी पक्षाची त्रिपुरी येथील भूमिका.

### श्री. जयप्रकाश नारायण यांचा खुलासा

त्रिपुरी येथील काँग्रेस अधिवेशनात श्री. गोविंद वल्लभपंत यानीं मांडलेल्या गांधीजींवरील विश्वासाच्या ठरावावर काँ. समाजवादी पक्षानें स्वीकारलेल्या तटस्थतेच्या धोरणामुळें बराच गैरसमज निर्माण होऊन, काँ. समाजवादी पक्षावर टीकेचा भडिमार झाला होता. काँ. समाजवादी पक्षाचे सरचिटणीस श्री. जयप्रकाश नारायण यानीं त्यावेळीं खालील पत्रक काढून आपल्या पक्षानें स्वीकारलेल्या धोरणाचें समर्थन व स्पष्टीकरण केलें:—

श्री. गोविंदवल्लभ पंत याच्या ठरावावर खुल्या अधिवेशनात काँ. समाजवादीपक्षाचे सभासद तटस्थ का राहिले, असा पुष्कळाना प्रश्न पडला आहे. या संबंधीं अनेक लोकानीं अनेक कयास केलेले दिसतात. काँ समाजवादी पक्षाच्या जन्मापासूनच त्या पक्षाची निंदा, नालस्ती करण्याचा विडा उचललेल्या टीकाकारानीं आपल्या स्वभावानुसार काँ. समाजवादी पक्षाचें त्रिपुरीचें धोरण संधिसाधू व सरदार वल्लभभाई प्रभृतींची खुशामत करण्याच्या इराद्यानें ठरलेलें होतें, असा अभिप्राय दिला आहे. परंतु अशा टीकाकाराना उत्तर देण्याचे भरीस मी उगीच पडत नाहीं.

आम्ही तटस्थ का राहीलों ही गोष्ट मी थोडक्यात स्पष्ट करूं इच्छितों. आम्ही त्या ठरावाविरुद्ध मत न देण्याचें पहिलें कारण

असें आहे की, आम्ही महात्मा गांधी व त्यांचे अनुयायी काँग्रेसच्या बाहेर जावेत असें इच्छित नाहीं. पंतांचा ठराव नापास झाला असता तर गांधीजी व त्यांचे अनुयायी काँग्रेसच्या बाहेर पडले असते. याचा देशावर किती वाईट परिणाम झाला असतां याची कल्पना करा. विशेषतः आम्ही एका बाजूनें अखिल भारतीय सत्याग्रहयुद्ध लौकरच सुरू करण्याच्या गोष्टी बोलत असतां अशा तऱ्हेची फूट पाडणें देशाचे दृष्टीनें अत्यंत हानिकारक होतें. सत्याग्रहयुद्ध व्हावें असें मनापासून आम्हास वाटत आहे, म्हणूनच आम्ही ऐक्य टिकवण्याचा आटोकाट प्रयत्न केला. श्री. गोविंदवल्लभ पंत यांचे ठरावांतील कांहीं भाग आम्हास अमान्य आहे; तरी या ठरावानें, सरदार वल्लभभाई प्रभृतींनीं आपल्या राजीनाम्याचे पत्रांत विषद केलेला एकजिनसी अधिकार मंड-

ठाम मत झालें होतें कीं, राष्ट्रीय चळवळीच्या व काँग्रेसच्या दृष्टीनें काँग्रेसचें अधिकारमंडळ गांधीजींच्या सल्ल्यानेंच निवडलें जावें व गांधीजींच्या पूर्ण विश्वासांतील असावें हेंच योग्य आहे.

आम्ही त्या ठरावाचे बाजूनें मत न देण्याचें कारणहि उघड आहे. त्या ठरावात अभिप्रेत असलेले कांहीं सिद्धांत व अभिप्राय आम्ही मान्य करीत नाहीं. उदाहरणार्थ, ठरावात म्हटल्याप्रमाणें, आणीबाणीच्या वेळीं " गांधी एकटेच " देशाचें नेतृत्व करूं शकतील ही गोष्ट आम्हांस मान्य नाहीं.

या दोन्ही बाजूचा शांतपणें विचार केला म्हणजे, तटस्थ रहाणेंच आम्हाला क्रमप्राप्त होतें, ही गोष्ट लक्षांत येईल ज्यांचा गैरसमज आहे किंवा ज्यांना आमचा सूड उगवावयाचाच आहे, फक्त तेवढेच लोक कॉं. समाजवादी पक्षानें " गांधीना समाजवाद विकला " असा असभ्य आरोप आमचेवर करतील. कॉं. समाजवादी पक्षाचे वतीनें मी ठरावातील तत्त्वार्थी आमचा कांहीं ठिकाणीं सैद्धान्तिक मतभेद आहे असें सभेमध्यें स्पष्टपणें जाहीर करून तटस्थतेचें धोरण स्वीकारलें असल्यामुळें, असा आरोप सर्वस्वीं निराधार आहे. काँग्रेसमध्यें ऐक्य राहाणें या घटकेला अत्यंत आवश्यक आहे, असें आमचें ठाम मत आहे. व म्हणूनच आमचें धोरण राष्ट्रहिताचे दृष्टीनें बरोबर होतें असें आम्हांस वाटतें. याचे ऐवजीं आम्ही विरुद्ध मतें दिलीं असतीं तर काँग्रेसचें अनहित साधल्यासारखें झालें असतें, व आमचेवर संकुचित गटबाजीच्या वळीं पडण्याचा आरोप आला असता. काँग्रेसनें समाजवाद मान्य करावा कीं, गांधीवाद हा प्रश्न नव्हता काँग्रेसची दुफळी होऊं द्यावी किंवा जुन्या धोरणानुसार काँग्रेस-

मधील सर्व गटांनी संयुक्त राहून काम करावें, हा प्रश्न होता. काँग्रेसच्या मूलभूत धोरणांत किंवा कार्यपद्धतीमध्यें एकदम बदल करावा, अशी आमची कधींच इच्छा नव्हती. काँग्रेसचें पूर्वीचें धोरण व कार्यपद्धति मान्य आहेत असें जाहीर करण्यांत दिक्कत वाटण्याचें आम्हांस काहींच कारण नव्हतें.

## डाव्याच्या नांवानें बेशिस्त गोंधळ

आमचीं मतें जर प्रथमपासून अशीं होतीं, तर विषयनियामक कमिटीमध्यें आम्हीं या ठरावाचे विरुद्ध कां मतें दिलीं, असा एक प्रश्न साहजिकच कोणीं तरी विचारील. विषयनियामक कमिटी-मध्यें देखील आम्ही तटस्थच राहावयास पाहिजे होतें हें उघड

गोष्टींनंतर महात्मा गांधींच्या अपूर्व नेतृत्वाची व काँग्रेसमध्यें ऐक्य कायम ठेवण्याची आम्हाला तीव्र आवश्यकता भासूं लागली. शरद्बाबूंनीं माझ्या राष्ट्रीय मागणीच्या ठरावास विरोध केल्यामुळें "डाव्या गटाच्या" म्हणविणाऱ्या लोकांतहि ध्येय-धोरणासंबंधीं किती तीव्र भेद आहेत ही गोष्ट स्पष्ट झाली. ठरावाचा मसुदा आम्ही एकत्र बसून तयार केला होता ही गोष्टहि ते नाकबूल गेलेले पाहून तो ठराव पास होण्याची अधिकच आवश्यकता वाटूं लागली. वेळ अत्यंत थोडा असल्यामुळें व आमची संघटना असावी तितकी वाकबगार नसल्यामुळें, प्रतिनिधींशीं दर वेळीं विचारविनिमय करून सर्व गोष्टी वेळेवर त्यांना समजावून सांगतां आल्या नाहींत. त्यामुळें थोडा गोंधळ होणें स्वाभाविक होतें. पण ही माझी चूक आहे. वर्तमानपत्रांतील अर्धवट किंवा विपर्यस्त बातम्यामुळें बाहेरहि बराच गैरसमज पसरला आहे. आम्ही तीन उपसूचना मांडल्या होत्या. श्री पटवर्धनांची, माझी व भारद्वाज यांची. गैरसमज झाले तरी तें दूर करतां येतील; परंतु या संधीचा फायदा घेऊन आपण काहींतरी वादविवाद वाढवीत बसलों तर राष्ट्रीय व समाजवादी चळवळीचें नुकसान झाल्याशिवाय राहणार नाहीं.

ऐक्य राखण्याकरितां आम्ही आवाच्यासवा किंमत देऊन बसलों आहों अशीहि टीका कांहींजण करतात. पण मला तेंहि मान्य नाहीं. आम्ही आमचा तात्विक विरोध जाहीर करून तटस्थ राहिलों, यात काय किंमत दिली ? या ठरावानें काँग्रेसमध्यें नवीन अर्थ कांहींच येणार नसून, जुन्या धोरणांस व तत्वांस मान्यता मिळाली आहे. 'मागील अंकावरून पुढें चालू' येवढेंच जाहीर केलें आहे. काँग्रेसचे मूलभूत सिद्धांत आम्ही

मार्गेंच मान्य केले आहेत. तेव्हा या ठरावानें आमच्यावर कोणत्याहि संस्थेची नवीन बंधनें पडतात असें मानण्यास जागा नाही.

हा खुलासा पुरा करण्यापूर्वी या शुष्कवादापेक्षा अधिक महत्त्वाच्या अशा झालेल्या कांही गोष्टींकडे मी जनतेचें लक्ष वेधूं इच्छितो.

हिंदुस्थानामध्यें समाजवादी चळवळीबद्दल आस्था बाळगणारांना सोशालिस्ट व कम्युनिस्ट, एक अपवाद सोडला तर, या अधिवेशनांत एकमतानें वागले, व समाजवादी गटाचें ऐक्य प्रथम साध्य झालेलें दिसलें याबद्दल समाधान वाटेल. प्रथम पंतजींच्या ठरावावर तटस्थ राहाण्याचें कम्युनिस्टांनीहि मान्य केलें होतें पण त्यांनी नंतर आपलें धोरण बदललें. या शुष्क गोष्टींवर जे वाद निर्माण करीत आहेत ते समाजवादी चळवळीचें नुकसान करीत आहेत असें माझें नम्र मत आहे.

राष्ट्रीय लढ्याच्या दृष्टीनेंहि त्रिपुरीनें पुढें पाऊल टाकलें आहे. लाहोर काँग्रेसप्रमाणें त्रिपुरीचें अधिवेशन इतिहासप्रसिद्ध होईल अशी माझी खात्री आहे. राष्ट्रीय मागणीच्या ठरावानें अखिल भारतीय लढ्याकरितां सज्ज होण्याचा राष्ट्रास इशारा केला आहे. अखिल भारतीय लढा सुरू करावयाचा आहे हें आपण ध्यानांत ठेवलें पाहिजे. त्रिपुरीनें रणशिंग फुंकलें आहे. शुष्क वाद न करतां पुढें पाऊल टाकीत आपण चालूं लागलें पाहिजे.

# परिशिष्ट २

## जमशेटपूर येथील भाषणाबद्दलच्या खटल्यांत जयप्रकाश नारायण यांनीं दिलेली जबानी.

"जयप्रकाश नारायण यानीं कोर्टापुढें दिलेल्या जबानीची एक प्रत माझ्याकडे पाठविली आहे ती खालीं छापली आहे. ती जबाब थोडक्यात मुद्देसूद, स्पष्ट आणि त्याना शोभणारा असा आहे. त्यानीं म्हटल्याप्रमाणें खरोखरच त्याच्या देशभक्तीबद्दल त्यांना शिक्षा व्हावी हा दैवदुर्विलासच होय. आज लाखों लोकाच्या मनात या गोष्टी आहेत, आणि हजारो लोक या गोष्टी आपापसात बोलतात. त्याच गोष्टी जयप्रकाशनीं जाहीरपणे आणि प्रत्यक्ष युद्ध-साहित्य निर्माण करणाऱ्या लोकासमोर बोलून दाखविल्या. त्याचें म्हणणें जर परिणामकारक ठरलें आणि तें जर पुनः पुनः सागितले गेलें तर सरकार संकटात सापडेल ही गोष्ट सत्य आहे. पण अशा संकटकाळीं एकाद्या हिंदी देशभक्ताला शिक्षा करण्याऐवजीं हिंदुस्थानबद्दलच्या आपल्या धोरणाचा त्यानीं फेरविचार केला पाहिजे.

"त्याच्या जबानींतील शेवटच्या भागात त्याची अतीव मानवता दिसून येते. त्याच्या मनात कोणाबद्दल हेवा नाहीं. साम्राज्यशाही आणि नाझीशाही ह्या दोन्हीचा नाश व्हावा अशीच त्याची इच्छा आहे. इंग्रज लोकाशीं किंवा जर्मन लोकाशीं त्याचे कुंठ-

त्याहि प्रकारचे शत्रुत्व नसून उलट इंग्लंडनें जर आपल्या साम्राज्याचें विसर्जन केलें तर फक्त हिंदुस्थानच काय पण जगांतील सर्व स्वातंत्र्यप्रेमी जनता नाझीशाहीचा विनाश व्हावा आणि लोकशाहीचा व स्वातंत्र्याचा विजय व्हावा म्हणून आपलें शक्तिसर्वस्व वेचल्याशिवाय रहाणार नाही असेंच त्याचें म्हणणें आहे."

मो. क. गांधी

## जबानी

"दारूगोळा व युद्ध चालविण्यासाठी आवश्यक अशा वस्तूंच्या उत्पादनांत अडथळा आणण्याचा प्रयत्न करण्याचा, तसेंच लोकांची वृत्ति आणि भूमिका युद्धविरोधी बनविण्याचा आरोप मजवर करण्यांत आला आहे. आणि मी हे दोन्ही आरोप मान्य करतों.

पण हे आरोप म्हणजे माझ्या दृष्टीनें गुन्हा नसून एक कर्तव्यच आहे. आणि कोणत्याही प्रकारें परिणामाची फिकीर न करतां तें मी पार पाडलें आहे. तसेंच या देशांत पाशवी शक्तीच्या जोरावर स्थापित झालेल्या सरकारी कायद्याप्रमाणें हा गुन्हा ठरतो याचीहि मला पर्वा नाहीं. कारण या कायद्याचें

दडपशाही, पिळवणूक आक्रमण इत्यादि स्वार्थी हेतूंनीच या युद्धातील दोन्ही पक्ष पछाडले गेले आहेत. ज्या नाझीवादाचें पोषण इंग्लंडनें केले त्याचा नाश करण्यासाठीं ब्रिटिश आज लढत नसून केवळ आपल्यापेक्षा अधिक बलवान होणाऱ्या प्रतिस्पर्ध्यांची शक्ति खची करण्याचा हा त्याचा प्रयत्न आहे. जगांतील आपलें प्रभुत्व, साम्राज्य आणि वैभव कायम टिकवण्यासाठींच ते आज लढत आहेत. आणि हिंदुस्थानापुरतेंच बोलायचें तर आपलें हिंदी साम्राज्य कायम टिकवण्यासाठींच ते आज लढत आहेत.

म्हणून अशा युद्धाशी हिंदुस्थानचा काहीहि संबंध असूं शकत नाहीं ही गोष्ट स्पष्ट आहे. साम्राज्यशाही फोफावण्यासाठीं आपल्या देशातील संपत्तीचा उपयोग व्हावा आणि त्या संपत्तीचा युद्धकार्यात उपयोग होऊन आपल्या गुलामगिरीच्या, साखळ्या आवळल्या जाव्यात ही गोष्ट कोणताहि हिंदी माणूस चालू देणार नाहीं. आणि राष्ट्रवादी हिंदुस्थानची एकमेव जी काँग्रेस तिनें आपल्या देशांबंधीनें हें पवित्र कर्तव्य अगोदरच दाखवून दिलें आहे. आणि त्या काँग्रेसचा एक नम्र सैनिक या नात्यानें तें पार पाडण्याचा मी प्रयत्न केला आहे.

पण याच्या उलट हिंदी जनमताची काडीइतकीहि पर्वा न करतां ब्रिटिश सरकारनें हिंदुस्थानच्या वतीनें युद्ध जाहीर केलें असून, ज्या युद्धाला हिंदुस्थानचा संपूर्ण विरोध आहे त्या युद्धांत हिंदी सैनिक, हिंदी पैसा व हिंदी माल ह्यांचा भरपूर उपयोग करीत आहेत आणि ही गोष्ट म्हणजे जर्मनीनें ज्याप्रमाणें पोलंडवर आक्रमण केलें, तशाच गंभीर स्वरुपाचें आक्रमण ब्रिटननें

हिंदुस्थानवर केल्यासारखी आहे. आणि हिंदुस्थान या आक्रमणाचा प्रतिकार केल्याखेरीज रहाणार नाहीं. म्हणून देशांतील संपत्तीचा युद्धप्रयत्नासाठीं उपयोग करण्याच्या ब्रिटिश सरकारच्या प्रयत्नांना विरोध करणें हें प्रत्येक हिंदी देशभक्ताचें कर्तव्य होऊन बसतें. हिंदी देशभक्तांचें कर्तव्य म्हणजे गुन्हा आहे, ही ब्रिटिश सरकारची समजूत त्याच्या साम्राज्यवादी प्रवृत्तीची द्योतकच होय.

ज्या भाषणाबद्दल माझ्यावर खटला भरण्यात आला आहे, त्या भाषणानें माझें उद्दिष्ट कितपत साध्य झालें तें मला सांगता येणार

ज्या युद्धाला आमचा विरोध आहे, अशा युद्धात वाया जावी, ही गोष्ट लज्जास्पद आहे. आणि देशातील इतर ठिकाणचा मजूरवर्ग युद्धपरिस्थितीमुळे जागृत झाला असताना, जमशेदपूरचा कामगार वर्ग मात्र जणूं काहींच झालें नाहीं असें समजून वागतो, ही गोष्ट तर अधिकच शरमेची आहे. या खटल्यामुळें युद्ध बोनसच्या मागणीला. जरी जोर मिळाला, तरी खूप कार्य झालें असें मी समजेन.

माझी जबानी पुरी करण्यापूर्वी मला आणखी एक गोष्ट स्पष्ट करणें जरूर आहे. युद्धाला विरोध करण्याच्या माझ्या भूमिकेमागें जर्मनीला मदत करण्याची माझी इच्छा नाहीं. साम्राज्यशाही किंवा नाझीशाही यापैकीं कोणाच्याच विजयाची मी इच्छा करीत नाहीं. पण एक काँग्रेसवाला व समाजवादी या नात्यानें मला इंग्रज लोक व जर्मन लोक यांचेबद्दल *आपलेपणाच* वाटतो. जर हिंदुस्थानच्या युद्धविरोधामुळें नाझींचा विजय होणार असेल, तर नाझींचे प्राबल्य पत्करावें कीं स्वदेशात खरी लोकशाही आणि हिंदुस्थानात स्वातंत्र्य प्रस्थापित करावें, या गोष्टीचा विचार ब्रिटिश लोकांनीं केला पाहिजे. जर ब्रिटिशांनीं आपली आजची राज्य पद्धती बदलली, आणि भांडवलदार सत्ताधारी व साम्राज्यवाद याचा त्याग केला, तर फक्त हिंदुस्थानच काय, पण जगातील सारे स्वातंत्र्यप्रेमी लोक नाझीवादाच्या विनाशासाठीं आणि लोकशाही व स्वातंत्र्य यांच्या विजयासाठीं आपलें सर्वस्व वेचतील पण सद्यःस्थितीत ब्रिटिशांबरोबर लढा करून साम्राज्यशाहीचा नाश करण्याखेरीज दुसरा मार्गच हिंदुस्थानपुढें असूं शकत नाहीं आणि फक्त त्याच मार्गानें आम्ही जागतिक प्रगति व शांतता यांच्या प्रस्थापनेस मदत करूं शकतो...."

बाबतीत कॉंग्रेसचें नेतृत्व हें बऱ्याच अंशी मांडवलदारांचें वर्चस्वाखाली आहे या गोष्टीची पण आपणाला जाणीव होती. आणि म्हणूनच बहुजनसमाजाला त्याचें वर्चस्वापासून दूर करून क्रांतिकारक समाजवादाच्या नेतृत्वाखालीं आणणें, या कार्याला आपण सुरवातीपासून लागलो आहोत.

पण असें करीत असताना राष्ट्रीय चळवळींत एकजूट घडवून आणण्यासाठीं व ती कायम टिकवण्यासाठीं पक्षानें अविश्रांत कार्य केलें आहे. आणि या धोरणानुसार वागतांना कधीं कधीं अत्यंत गैरसमज माजविणारी भूमिका पण स्वीकारावी लागली आहे. पण तरीसुद्धां आजपर्यंत पक्षानें एकजुटीचें धोरण अगदीं सुसंगतपणें स्वीकारलें आहे.

पण मध्यंतरीच्या काळात युद्ध सुरू झालें. हें युद्ध आणि या युद्धातील इंग्लंडचें विशिष्ट स्थान यामुळें आमच्या कार्याचा पायाच बदलला आहे. राष्ट्रीय आघाडीपैकीं कांहीं मांडवलदार वर्ग व वरिष्ठ मध्यमवर्ग यांनीं साम्राज्यशाहीसंबंधींची आपली भूमिका बदलली आहे, आणि हा बदल आजच्या कॉंग्रेसमधील प्रभावी नेतृत्वात प्रतिबिंबित झालेला दिसतो. जर युद्ध सुरू झालें नसतें तर वरील वर्गसुद्धा बराच काळपर्यंत, साम्राज्यविरोधी लढ्यात आपणाबरोबर येतील अशी आपली कल्पना होती, पण युद्धामुळें त्यांचेपुढें नव्या आकांक्षा व नवीं संकटे उभीं राहिलीं आहेत. फ्रान्सचा पाडाव झालेला त्यांनी पाहिला आहे आणि इंग्लंडचीही लवकरच तीच गत होणार काय अशी त्यांना भिती वाटूं लागली आहे. आणि जर इंग्लंडचा पाडाव झाला तर हिंदुस्थानचे काय होणार ? या

ठिकाणीं अंदाधुंदी माजण्याचा संभव आहे. चलनपद्धति, व्यापार, कायदा आणि सुव्यवस्था हें कोसळून पडण्याचा संभव आहे आणि सर्वत्र बेबंदशाही माजेल, परकीय आक्रमण सुद्धां होईल. या भितीनें आज भांडवलदारवर्ग गांगरून गेला आहे. आणि या गोष्टींचा विचार करतां, संपूर्ण स्वराज्याची कल्पना त्यांना भीतिप्रद वाटते. साम्राज्यवादीच्या छत्राखालीं मिळणारें संरक्षण व ब्रिटिश अर्थपद्धतीमुळें मिळणारी आर्थिक, सामाजिक व राजकीय आणि आक्रमणविरोधी सुरक्षितता आज त्यांना फार महत्त्वाची वाटते. आणि या समजुतीवर त्यांचे धोरण आखलें जातें. तरीच युद्धामुळें जशीं संकटें आलीं आहेत, तशा नवीन आशा-आकांक्षा पण त्यांना आज दिसत आहेत. फ्रान्सचा पाडाव झाल्यामुळें त्यांना असें पण वाटूं लागलें आहे कीं, इंग्लंड आज पराकाष्ठेच्या संकटांत आहे, व म्हणून हिंदी भांडवलदाराकडे कांहीं सत्ता सोपवणें इंग्लंडला भाग पडेल. आणि सत्तेच्या बदल्यांत जगांतील आपली समाजपद्धती व ब्रिटिशांचे हितसंबंधरक्षणार्थ मदत करण्यास ते तयार आहेत. कारण, जर ही पद्धतीच कोसळून पडली तर त्यांचे वर्गहितसंबंध नामशेष झाल्याशिवाय राहणार नाहीत.

इतकाच की, कॉंग्रेस नेत्यांचे अंदाज चुकले. आणि सरकारच्या या कृत्यामुळें कोणत्यातरी स्वरूपांत साम्राज्यशाहीला विरोध दाखविण्याखेरीज दुसरा मार्गच वर्किंग कमिटीपुढें राहिला नाहीं, व म्हणून कॉंग्रेस नेत्यांनीं महात्मा गांधींना राजकारण-संन्यासापासून परत बोलवून कॉंग्रेसचें व लढ्याचें नेतृत्व स्वीकारण्यास विनंती केली. आणि ज्या तत्वांना कॉंग्रेसनें पुणें येथील बैठकींत हरताळ फासला होता, त्याच तत्वांच्या नावाखालीं आजचा लढा सुरू केला.

या पार्श्वभूमीवर विचार करतां, हा लढा काहीं साम्राज्यशाही उलथून टाकण्यासाठीं नाहीं ही गोष्ट स्पष्ट आहे. मग या लढ्याचें उद्दिष्ट काय? एक तर ज्या नेत्यांनी पूर्वी साम्राज्यशाही-समोर लाचारीचें धोरण स्वीकारलें, त्याची जात चाललेली प्रतिष्ठा वाढवणें. दुसरें कारण म्हणजे राजकीयदृष्ट्या जागृत नसलेल्या समाजाचा पाठिंबा, 'स्वार्थत्याग आणि क्लेश', यांचा देखावा करून कायम टिकवणें; आणि तिसरें कारण म्हणजे, साम्राज्यशाही-वर तडजोडीसाठीं दडपण आणणें. ज्या मुंबईच्या ठरावांत या लढ्याची घोषणा दिली आहे, त्यांत दिलीचा दिलेला सहकार्याचा हात रद्द समजण्यात आला, असें म्हटलें असलें तरी, नंतर झालेल्या घडामोडींवरून ज्या विधानांना गंभीरपणें विचार करणें म्हणजे फसवणूक होय, ही गोष्ट दिसून आली आहे. पूर्वीच्या घडामोडी आणि कॉंग्रेसच्या अध्यक्षांसह प्रमुख कॉंग्रेस-नेत्यांचे उद्गार हीच गोष्ट दाखवतात की, दिल्लीची भूमिका अजून रद्द झालेली नाहीं. आणि जर आंतरराष्ट्रीय परिस्थितिमुळें ब्रिटिश सरकारला दिल्ली-मागणी किंवा तत्सम सत्ता कबूल करणें भाग पडलें, तर कॉंग्रेसचे नेते सत्याग्रह मागे घेऊन कॉंग्रेसला सरकारबरोबर

सहकार्यांत गुंतवतील किंवा काय, अशी भीति वाटते. आणि असें झालें म्हणजे आजच्या ब्रिटिशांचा जागतिक पद्धतीचाच एक भाग हिंदुस्थान होऊन जाईल. आणि या साम्राज्यशाही युद्धांत पण सामील होईल; व या गोष्टी काँग्रेसच्या नेतृत्वाखालीं घडतील.

गांधीजी हिंदुस्थाननें कोणत्याही युद्धांत भाग घ्यावा या गोष्टीला संमति देणार नाहींत ही गोष्ट जमेस धरूनही वरील गोष्टी घडण्यास प्रत्यवाय येणार नाहीं. कारण गांधीजींनीं राजकारणांतून अंग काढून घ्यावें याबाबत गांधीजींचें मन वळवणें काँग्रेस नेत्यांना अवघड जाणार नाहीं. उलट आपल्या सत्याग्रहाच्या सेनापतिपदाच्या भूमिकेवरून गांधीजींनीं अनेक वेळा स्पष्ट केलें आहे कीं, ब्रिटिश सरकारला संकटांत टाकण्याची त्यांची इच्छा नाहीं. आणि युद्धकालांत साम्राज्यशाहीला त्रास करण्याची पण त्यांची इच्छा दिसत नाहीं. आणि या गोष्टीमुळें वर सत्याग्रह चळवळी संबंधी जें विवेचन केलें आहे तें अधिकच समर्थनीय ठरतें. मग अशा स्थितींत आपलें कार्य काय ?

### पक्षाचें पर्यायी धोरण

म्हणून पक्षानें सतत प्रयत्न केले आहेत. तसेंच पुण्यास ज्याप्रमाणें तडजोडीस पक्षानें विरोध केला, त्याप्रमाणें कोणत्याही तडजोडीच्या धोरणास आपला विरोध आहे ही गोष्टही पक्षानें स्पष्ट केली आहे.

राजकीय चळवळीसाठीं पक्ष संपूर्णपणें काँग्रेसवर कधींच अवलंबून राहिला नाहीं. युद्धपूर्वकालाप्रमाणें आजही पक्षानें युद्धविरोधी प्रचार चालू ठेवला आहे. सत्याग्रह सुरू होण्यापूर्वींच या कारणासाठीं पक्षाच्या शेंकडों सभासदांना पकडून अटकेंत ठेवण्यात आलें आहे. याशिवाय किसान व कामगार यांच्या वर्गसंघटनांनीं पण स्वतंत्रपणें राजकीय चळवळ करावी या मताचा पक्षानें नेहमींच पुरस्कार केला आहे. आणि किसान-कामगार चळवळीवर पण पूर्वीपेक्षा पक्षानें अधिक भर दिला आहे, आणि या चळवळींत काम करणारे पक्षाचे सभासद आजच्या परिस्थितींत जितकें कार्य करता येईल, तितकें करीत आहेत.

पण सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे आजवरचें आपलें धोरण व भूमिका काँग्रेस हीच साम्राज्यविरोधी लढा करणारी प्रमुख राजकीय संस्था आहे या कल्पनेवर आधारलें होतें.

## पक्षाचें सध्याचें धोरण

पण वर वर्णन केल्याप्रमाणें युद्धकालात जी परिस्थिती निर्माण झाली आहे तीमुळें ही आधारभूत कल्पना बदलणें भाग आहे. आतापर्यंत काँग्रेसच्या पुढाऱ्यानें मूलभूत धोरण आणि लढ्याचें स्वरूप हें कसें तडजोडवादी आहे हें दाखवून दिलें आहे. या लढ्याचें जनतेच्या क्रांतिकारक उठावात रूपांतर होण्यास पुढील दोन गोष्टींपैकीं एक जरूर आहे. एक तर, काँग्रेसमधील इतर क्रांतिकारक गटाच्या सहकार्यानें आपण काँग्रेसचें व या चळवळीचें

नेतृत्व मिळविलें पाहिजे किंवा सद्यःस्थितींतून तरून जाण्याइतकी शक्ति ब्रिटिश साम्राज्यशाहींत असल व काँग्रेसशी तडजोड करण्याचे ती नाकारील, तरच जनताउठाव शक्य आहे. सध्याच्या परिस्थितींत पहिली अट पुरी होणें शक्यच नाहीं. आणि दुसरी पुरी होण्याची फारशी संभाव्यता दिसत नाहीं. पण असें असूनही आपण वर खालील कार्यक्रम अमलांत आणला तर पुढें होणाऱ्या जनतालढ्यांत भाग घेणें आपणास शक्य होईल. म्हणून आपलें धोरण आज काय असलें पाहिजे ? काँग्रेस आपल्या देशांत राष्ट्रीय क्रांति करण्याचें साधन आहे, व तीच साम्राज्यशाहीचा पुरा मोड करून लोकसत्ताक राज्य प्रस्थापित करील ही कल्पना आतां आपण टाकून दिली पाहिजे. काँग्रेसचे नेते हे तडजोडीसाठीं अधीर असून राष्ट्रीय क्रांतीचें कार्य त्यांचे हातून पूर्णपणें सफल होणार नाहीं. ही गोष्ट स्पष्ट आहे. म्हणून साम्राज्यशाहीचा विनाश करण्याचें राहिलेलें कार्य पुरें करण्यासाठीं किसान, कामगार व गरीब मध्यमवर्ग यांची एकजूट निर्माण करणें अवश्य आहे या एकजुटीचें स्वरूप किंवा आधारही कोणत्या स्वरूपाचा असेल हें आतांच सांगणें कठीण आहे. किंवा ही एकजूट आज निर्माणही करतां येणार नाहीं. काँग्रेसनें साम्राज्य-शाहीशीं तडजोड केली आणि तडजोडीचें स्वरूप व प्रकार काय आहे हें समजलें तरच ही एकजूट घडवून आणणें शक्य आहे. किंवा काँग्रेसशीं अधिक व्यापक प्रमाणावर जर जनता-आंदोलन स्वतंत्रपणें करण्याची एकवाक्यता निर्माण झाली तर ही गोष्ट शक्य आहे.

मग आतां आपण सर्व पक्ष या क्रांतींत विलीन करावा

काय ! काँग्रेसच्या लढ्याचें स्वरूप पहाता आपणास ही गोष्ट करतां येणार नाहीं. मग काँग्रेसपासून स्वतंत्र राहून जनता-आंदोलन सुरू करावें काय ! ही गोष्ट तर शक्यच नाहीं. मग पुढें काय !

आजचें आपलें कार्य दुहेरी आहे आणि त्याचें स्वरूप आपण नीट समजून घेतलें पाहिजे. काँग्रेसचें धोरण आज घरसोडीचें आणि तडजोडीचें असलें तरी आज तिचें जनतेंत चागलेंच वजन आहे आणि या सत्याग्रहाचा उपयोग तें वजन वाढण्याकडे जरी झाला नाहीं तरी तें कायम टिकवण्यात होणारच. काँग्रेस नेतृत्वा-संबंधींचा भ्रमनिरास हा फक्त क्रान्तिकारक बुद्धिजीवि, काँग्रेस-मधील जहाल लोक आणि मूठभर वर्गजागृत किसान–कामगार यांच्यापुरताच मर्यादित आहे आणि म्हणून सद्यःस्थितींत आपल्या पक्षाला या लढ्यापासून दूर ठेवणें घातकी व अदूरदर्शी-पणाचें ठरेल. म्हणून पक्षाच्या सभासदांनीं आपापल्या कमिट्याच्या सल्यानुसार सत्याग्रह केला पाहिजे.

पण पक्षाचें कार्य फक्त सत्याग्रहापुरतेंच मर्यादित ठेवून चाल-णार नाहीं. उलट असें केलें तर पक्ष आपल्या क्रान्तिकर्तव्यात चुकला असें होईल. आज जगभर फार मोठे बदल घडत आहेत. जागतिक भांडवलशाहींतील अर्थविरोध आज युद्धरूपानें परा-कोटीला पोचलेले दिसतात. आणि भांडवलशाहीचा सारा डोला-राच हादरलेला दिसतो. *आपल्या जीवनमरणाच्या सर्वांत मोठ्या* संकटात आज ब्रिटिश साम्राज्य सापडलें आहे, कारण *या लढ्यातून* महत्वाचे फेरबदल घडल्याखेरीज तें बाहेर पडणार नाहीं. या युद्धाचे जागतिक महत्वाचे परिणाम आज आपल्या देशातही जाणवतात आणि हिंदी जनतेला पुढें येणाऱ्या परिस्थितीचा

योग्य फायदा घेण्याची संधि आणून दिली पाहिजे. देशांत क्रांतिकारक वातावरण निर्माण होऊं नये म्हणून हरेक प्रयत्न केल्यावेगीज काँग्रेसचे पुढारी राहाणार नाहींत. म्हणून एक क्रांतिकारक पक्ष या नात्यानें पुढें येणाऱ्या फायदेशीर संधीचा योग्य उपयोग घेता यावा, अशा दृष्टीनें जनतेची तयारी करणें हें समाजवाद्यांनें पहिलें कर्तव्य होय.

युद्धामुळें साम्राज्यविरोधी लढ्याचा पायाच बदलला आहे. काँग्रेसमध्यें प्रतीत झालेली किसान-कामगार, गरीब मध्यमवर्ग व हिंदी मांडवलदार यांची संयुक्त आघाडी आज अभेद्य व कणखर राहिलेली नाहीं. म्हणून आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून एक गोष्ट सिद्ध होते की, आजपर्यंत कल्पना केल्याप्रमाणें काँग्रेस हीच आपल्या साम्राज्यविरोधी लढ्याची पायाभूत आघाडी ही कल्पना आतां आपल्या कामास आधारभूत धरतां येणार नाहीं. आतां किसान, कामगार व गरीब मध्यमवर्ग हेच वर्ग आपल्या लढ्यांत भाग घेतील.

स्थिति पालटली पाहिजे. शिवाय ज्यूट, ऊस, शेतकी–उत्पन्नाचीं मूल्यें, कर्जबाजारीपणा, युद्धासाठीं सक्तीनें धान्य व इतर वसूली इत्यादि प्रश्नाचा स्वनिर्णयपणें चळवळीस उपयोग करून घेऊन शेतकऱ्याची क्रान्तिकारक जागृति व शक्ति वाढवली पाहिजे.

वर किसान सभेवर इतका भर दिला आहे याचा अर्थ असा नव्हे कीं, आपण मजूर चळवळीकडे दुर्लक्ष करावें. उलट मजूर चळवळ ही कोणत्याही समाजवादी पक्षाच्या कार्यक्रमात अग्रमार्गी असली पाहिजे आणि म्हणून कामगार वर्गातील आपलें काम आपण पूर्वीपेक्षाही हिरीरीनें चालू ठेवलें पाहिजे, ही गोष्ट स्पष्ट आहे.

आपणापुढें आणखी एक महत्वाचें कार्य आहे. वर केलेल्या विवेचनावरून एक गोष्ट स्पष्ट झाली आहे कीं, जरी आपण सत्याग्रह चळवळींत भाग घेत असलों तरी त्या चळवळीचें खरें स्वरूप जनतेला आपण समजावून सांगितलें पाहिजे. पण त्याचवेळीं कॉंग्रेस चळवळीचें स्वरूप समजून सांगताना अतिशय काळजी घेणें अवश्य आहे. असें करीत असताना कॉंग्रेसविरोधी अशी भूमिका आपण कधींही घेता कामा नये. परंतु त्या चळवळीची तडजोडीची व वाटाघाटीची पार्श्वभूमि स्पष्ट करून सांगणें हें आपलें कार्य आहे.

आणि हें कार्य व्यवस्थित रीतीनें पार पाडण्यासाठीं पक्षाची मध्यवर्ति व स्थानिक संघटना तर अबाधित ठेवलीच पाहिजे. पण सर्व कार्यपद्धतीच नवीन पायावर पुनः संघटित केली पाहिजे.

---